


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






अनुक्रमणिका




## श्रेयनामावलि—

*कथा :*
- **आवर्त**—कमलाकर घारप • **अमरजन्सी**—पद्माकर गोवईकर • **तंबोरा**—सिनिक्

*एक व्यंगकृति :*
- **चित्रपत्रें**—एका व्यंगचित्रकाराचें स्वप्नरंजित पत्ररेखाटन

*चालू कादंबरी :*
- **भीष्माचा डोंगर**—श्रीराम कामत लिखित कादंबरीचा पुढील भाग.

*क्रिकेट पुरवणी :*
- **ते चारगीं दिवस**—बारकरी • **मी कप्तान होतो**—वाळ ज. पंडित • **अंपायरचा त्रिफळा**—दि. श्री. कराडकर • **गनिमी पवित्र्याचा जेसप**—मधुकर कोसारे • **हे असे आहेत भारतीय खेळाडू**—क्रीडाप्रेमी • **यंग इंग्लंड संघ**—शर्विलक • **क्रिकेटवर बंदी कां घालू नये?**—तिरंदाज

*ललित लेख :*
- **सीताचा ववसा आला नगरी**—डॉ. सरोजिनी बाबर

*आकर्षक सदरें :*
- **पेर्सी अक्षरें रसिकें मेळवीन**—प्र. श्री. नेरूरकर, श्रीपाद भागवत, नारायण सुर्वे,
- **दीपमाला**—सारस्वत, • **पानपूरकें**—दि. श्री. कराडकर, सदानंद चेंदवणकर, याशिवाय व्यंगचित्रें, विगचित्रें इत्यादि.

दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

टे. नं. ७७७६५

Gram : DALALART

* संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १। रु.+ रजि. पोस्ट ५५ न. पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचीही अधिकृत मतें असतातच असें नाहीं.


अनुक्रमणिका






**दीपावली**

## दलाल आर्ट स्टुडिओ


४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४,

टेलिफोन : ७७७६५ ★ तारेचा पत्ता : DALALART


● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० न. पै., द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टूडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ न. पै. वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर निर[illegible]याचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर **नाहीं**.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.


संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, **फ्रेंच** ब्रीज, मुंबई ४ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# भारता, आत्मविश्वासाच्या निर्धाराने पुढें जा !

हे भारता, तुझ्यावद्दल पार गैरसमजांत वुडून गेलेल्या खलांनी तुझी कुरापत काढली. त्यांना वाटलें तूं निधर्मी म्हणून तुला कसल्याच धर्माची चाड नसणार. धर्माचें अधिष्ठान नसलेला कुणीहि सैतानास आपलें भक्ष वाटत असतो. तूं निधर्मी आहेस पण धर्महीन नव्हेस हें ज्याला कळलें नाहीं असा सैतान जिभल्या चाटीत तुझ्यावर चालून आला. त्याला वाटले हा घांस आपल्या पोटांत गेलाच.

पण त्या सैतानाचा हा कावा ओळखून तूं आपल्या धर्माचें स्मरण केलेंस. जो धर्माचें रक्षण करतो त्याचें धर्म रक्षण करतो हें चिरंतन सत्य आहे. तुझ्या धर्मानेंहि संकटांत तुझा त्याग केला नाही. भारता, धर्म म्हणजे कांहीं यज्ञोपवीताची ब्रह्मगांठ मुठींत धरून तासचे तास ध्यानस्त बसणे नव्हे. समाजाच्या स्थिर कल्याणासाठीं स्थलकालोचित प्राप्त कर्तव्यें करणें म्हणजे धर्म, याचें ज्ञान तूं सदैव जागृत ठेवलें आहेस याची सैतानाला जाणीव नव्हती. त्यामुळें तूं आपल्या धर्माला जागलास याचें सर्वांत अधिक नवल सैतानालाच वाटलेलें आहे.

भारता, अशावेळीं सैतान जीं नाना सोंगें आणीत आहे त्याचा उद्देश तुला कांहीं करून भिवविणें, विकंपित करणें हा आहे. हितशत्रूहि आज मित्रांची सोंगें घेऊन तुझी काळजी वहातांना दिसत आहेत. यांतील किती एकांस सैतानाची प्रेरणा असेल नकळे. तुझें रणसामर्थ्य उणें आहे हें तुला सांगणारे मित्र हेही असेच घातकी शत्रू आहेत. भारता, रणें जिकली जातात तीं रणसामर्थ्यामुळें नव्हे तर रणनिर्धारामुळें. रणनिर्धार अविचल असेल तर रणसामर्थ्य आपोआप चालत येतें. याचे दाखले तुझ्या इतिहासानें तुझ्यासमोर पानोपानीं लिहून ठेविलें आहेत.

मारीच आणि सुबाहू यांच्या पासून श्रीरामांनी विश्वामित्राच्या यज्ञाचें रक्षण केलें तेव्हां त्याचें वय किती होतें ? श्रीकृष्ण कंसावर चालून गेले तेव्हां त्यांचें रणसामर्थ्य किती होतें. विजापूरच्या भर बाजारांत शिवाजीनें खाटिकाचा हात तोडला तेव्हां त्याचें वय आठच वर्षांचे होतें ना ? या विजयी वीरांनी कां तेजाचा स्फुलिंग प्रकटण्याचा समय आला तेव्हां आपल्या रणसामर्थ्याची मोजमाप करीत तो क्षण हातचा दवडिला ? आसेतु हिमाचल पसरलेल्या बुद्धाच्या तत्त्वज्ञानाच्या रानांत जेव्हां श्री शंकराचार्यांनी निडरपणें प्रवेश करून त्याचा उच्छेद केला तेव्हां त्याच्यासमोर कां कमी संकटें आलीं ? स्वातंत्र्यवीर सावरकरांनी जेव्हां ब्रिटिश दंडसत्तेला चपराक मारून सागरांत उडी घेतली तेव्हा कां त्यानीं सागराच्या रुंदीचें मोजमाप घेतलें ? महात्मा गांधींनी जेव्हां दांडीवर मोर्चा नेला तेव्हा कां आपल्या हातांतील बांबूची लुकडी कांठी साम्राज्यसत्तेच्या मशिनगनचा मारा साहील कीं नाही याचें गणित केलें ? भारता अशीं उदाहरणें तुझ्या मायभूमींत तुला किती हवी ? परिस्थितीचा बाऊ न करतां आत्मविश्वासाच्या निर्धारानें आणि प्राप्तकर्तव्यावरील अटळ निष्ठेनें या वीरांनी परिस्थितीवर मात केली म्हणूनच हे अवतारी पुरुष ठरले. आज तुझ्या सुदैवानें तुला पुन्हां सुसंधी आलेली आहे. सुसंधी ही नेहमी संकटाच्या रूपानेंच पुढें ठाकत असते. या संधीची शेंडी पकडून तूं आधींच तिच्यावर आरूढ झाला आहेस. आपले तेज तूं पुन्हा एकदां जगाला दिपवित प्रकट करणार आहेस.

हें ज्यांना पहावत नाहीं असे तुझे शत्रू आणि हितशत्रू आतां तुझे पाय ओढण्यासाठीं नाना मर्कटलीला करून दाखवीत आहेत; आणखी दाखविणार आहेत. तुला यावेळीं एकच गोष्ट करावयास हवी. प्राप्त कर्तव्याविषयींचा तुझा निर्धार अटळ राखावयास हवा. या निर्धारांतून जो आत्मविश्वास तुला प्राप्त होईल त्यांतून तुला जयाचा मार्ग अचूक उजळलेला दिसेल. निर्धार दृढ हवा. चित्त कर्तव्यपालनासाठीं कठोर हवें.

—उषाकान्त




अनुक्रमणिका

## एक निडर पत्र

स. न. वि. वि.

बऱ्याच दिवसांत आज पत्र लिहित आहे. यंदाच्या "दीपावली"च्या दिवाळी अंकाबद्दल मला फार लिहावेसें वाटतें. पण आपण माझ्या लिहिण्यानें कदाचित रागावण्याचाहि संभव आहे म्हणून मुद्दामच उशिरा लिहीत आहे.

आपला दिवाळी अंक सर्वांगसुंदर निघाला आहे यांत शंका नाहीं. आपली स्वतःची रंगीत चित्रें नेहमीप्रमाणेंच आकर्षक आहेत, त्यांतले त्यांत "तपस्विनी गंगा" हे चित्र काव्यमय, कल्पनारम्य व नितांतसुंदर आहे. श्री. पु. ल. देशपांडे यांनी मात्र या खेपेला आपल्यापेक्षां "केसरीवर" जादा मेहरनजर केली आहे. मला वाटते त्यामुळेंच आपल्या चित्रकारानें त्यांच्याहि गळयांत वेडीवजा पट्टा अडकवला आहे ! अर्थात अज्ञ बालके चित्रांत सूड उगविल्याचे समाधान मानोत. प्रतिभासंपन्न अभिजात लेखक कसलेच बंधन मानीत नाही व पालापाचोळयामधून तो उत्कृष्ट लेखनिर्मिति करूं शकतो हे त्यांनीं "पाळीव प्राण्यांवरील आपल्या निबंधांत दाखविले ही गोष्ट वेगळी.

दिवाळी अंकांतील लेखांच्या दर्जाबद्दल माझे मत चांगले आहे. माझा आक्षेप आहे तो दिवाळीच्या मंगल व आनंदी वातावरणाच्या प्रसंगीं बहुविध, चित्रविचित्र सुरस बहुविध पक्वान्ने देण्याऐवजीं आपण काढेचिराइत, सोनामुखीबाळहिरडा वा डॉ. खऱ्यांचा जमालगोटा असली परिणामकारक अत्यंत उपयुक्त पण प्रसंगाला अगदी अप्रयोजक अशी औषधेंच आपण सादर केली आहेत. प्रथमग्रासे "आला क्षण गेला क्षण" हा श्री. भाव्यांचा लेख ! अत्यंत सुंदर असा हा लेख आपण डिसेंबरच्या अंकांत छापला असता तर ? दिवाळीअंकांत छापून आपण औचित्य भंग केला असे लिहिले तर खुद्द श्री. भावेसुद्धां रागावणार नाहींत अशी माझी खात्री आहे. श्री. श्रीराम कामत यांच्या 'चेटूक' बद्दल एक वेगळा आक्षेप आहे. आतांपर्यंत बोहोल्यावर मंत्र्यांनीं बांधलेली लग्नगांठ फसवणुकीची निघाली तर ती तोडण्यासाठीं साऱ्या सुशिक्षित समाजानें तडफड केली व ती गोष्ट समाजाच्या गळी उतरविली "असे पति देवचि ललनांना" हे संगीतांत ठीक असले तरी व्यवहारांत तितकेसे खरे मानण्याचे कारण नाहीं असें आंता सर्वांना पटू लागलें आहे. फसवणुकीनें लुच्चेगिरीनें, धाकानें किंवा जबरदस्तीनें लागलेले वा लावलेले विवाहबंधन मानण्याचे अजिबात कारण नाहीं हे आतां जवळजवळ सर्वमान्य झाले आहे. असे असतांना या गोष्टीचा शेवट विशेषतः खेडयांतील




स्वतंत्रवृत्तीच्या तरुण मनाशीं अगदीं विसंगत वाटतो. आपली व्यंगचित्रें फटाक्याप्रमाणेंच हादरून सोडणारीं आहेत त्यांतहि भारतीय महोत्सवांपैकीं "रंगपंचमी" व "विजयादशमी" फार आवडलीं. कथांबद्दल काय लिहावे. चांगल्या आहेत "शपथ" चा शेवट खरोखरच छान आहे तितकाच कल्पनारम्य आहे. "निर्माल्य" कथा चांगली असली तरी तिचा विषय पुष्कळदां चर्चित आहे. शिरीष पैं नीं एक अगदींच नवीन दृश्य चांगले रंगविले आहे (त्याहि बाबतींत श्री. पु. भा. भाव्यांनीं दीपावलीच्याच बऱ्याच जुन्या अंकांत फार सुंदर चित्रण केले होते. मात्र त्यांनीं मुलाच्या भावना चित्रित केल्या होत्या.)

आपल्या लक्षांत येईलच की "दीपावली" चा मी एक प्राथमिक वाचक आहे व आपल्या मासिकाबद्दल कलेबद्दल मला फार प्रेम वाटतें. तेव्हा या पत्रांतील भावना जाणून रागाऊ नये. "दीपावली" उत्तरोत्तर अधिक यशस्वी होवो.

आपला

**—ना. दा. पालकर**

Asst. Manager,
Comptoir National
D'Escompte de Paris,
Calcutta.

## इंग्लंडचे निमंत्रण

स. न. वि. वि.

'दीपावली' चा अंक फारच सुरेख असा आहे. आम्हांला इकडे वसंत, अमृत, मोहिनी, मनोहर, स्त्री, किर्लोस्कर इत्यादि अंक वाचावयास मिळाले. त्यामध्यें दीपावलीचे स्थान कितीतरी उजवे आहे. यावेळेस मात्र आपण आपल्या 'रेखाचित्रे' विभागांत वैयक्तिक टीकेवर जरासा भर दिला आहे असे वाटते. अर्थात कवितेनुरूप चित्र काढायचें म्हणजे कांहीं गोष्टी अटळ असतात हे कबूल करून सुद्धां ही गोष्ट मनाला खटकली.

दुसरी एक विनंति आहे. येथील इंडीया हाऊस मध्ये सर्वतऱ्हेची (बरीचशी हिंदी बंगाली, गुजराथी) मासिके येतात परंतु मराठी एकहि मासिक येत नाहीं. आपण 'दीपावली' मासिक येथील लायब्ररीयनच्या नांवे पाठवाल कां ? तसेंच आपल्या कांहीं इतर संपादक मित्रांनाहि वरील प्रकारची विनंति शक्य असल्यास केल्यास फारच उत्तम.

आपला

**माधव जोशी,**

Golden Green Branch,
London N.W. 11.

## संक्रांत शुभेच्छा !

स. न. वि. वि.

आपल्या मासिकांची दिवसें दिवस भरभराट होवो व यश लाभो ही या शुभदिनी परम मंगल परमेश्वरापाशी प्रार्थना.

आपला

**एस. एन. वारघडे,** पावळ

**(वारघडे धन्यवाद ! तुमच्याप्रमाणेंच अनेक वाचकांनी व हितचिंतकांनी संक्रांतीच्या तिळगुळासहित शुभेच्छा पाठविल्या आहेत. याच उत्तरांत सर्वांस धन्यवाद !**

**—संपादक )**

### २६ जानेवारीच्या मंगलदिनी त्या शूर विरांना मानाचे अभिवादन !

**भारतीयांच्या जीवनांतून २६ जानेवारी हा मंगलमय दिवस कधीहि अन् कुणालाहि दूर सारता येणार नाही. १९४९ च्या याच दिवशीं समस्त भारतवासीयांना सामाजिक, आर्थिक, राजकीय व वैचारिक स्वातंत्र्य मिळाले. परंतु याच आपल्या स्वतंत्र मायभूमीवर चीनचे नक्षासूरी आक्रमण अचानक कोसळले. मायभूमीची ही अमानुषी मानहानी कोणताहि भारतीय कदापीहि सहन करणार नाही. आणि म्हणूनच जन्मभूमीच्या आत्मरक्षणासाठीं ज्या शूर विरांनी उत्तर सीमेवर आपली शीरकमलें स्वातंत्र्यसंगरांत अर्पण केली व जे वीराग्रणी सीमारक्षणार्थ सज्ज आहेत त्यांना आजच्या या शुभप्रसंगी दीपावली व असंख्य वाचकांतर्फे मानाचे अभिवादन !**









अनुक्रमणिका

कमलाकर धारप



**शान्त** समुद्रकांठ, कांठावर सरपटत येणारें निळें फेसाळ पाणी. पाण्यावर चमचमणारी उतरत्या उन्हाची किरणं. त्या किरणांना शीतल करणारा पश्चिमवारा. त्या वाऱ्यानें फडफडणारी तरत्या होड्यांची पांढरीशुभ्र शिडं. पाण्यावर झेंपा घालणारे समुद्रपक्षी. एखाद्या चौकटींत एखादें निसर्गदृश्य बंदिस्त करून ठेवावें तसें त्या दृश्याकडे पाहून वाटत होतें.

आज कितीतरी दिवस मी हा समुद्रकांठ पहात होतो, पण त्याची मूल माझ्या मनावरून अद्याप उतरली नव्हती. रोज मी अतृप्त मनानें समुद्र किनाऱ्यावरून परतत होतो व तृप्त होण्याच्या आशेने पुन्हापुन्हा समुद्राकडे वळत होतो. प्रत्येकवेळीं समुद्रानें वेगवेगळी रुपें घेऊन मला भुलविलें होतें. कधी त्याच्या शान्त रूपानें तर कधी क्षुब्ध रूपानें, कधी खट्याळपणानें तर कधी गंभीरतेनें. आजदेखील नित्यासारखाच मी चौपाटीवर फिरायला आलो होतो; पण आज मी एकटा नव्हतो. माझ्यावरोबर मला नव्यानेंच गवसलेला मित्र होता. समुद्राइतकाच अथांग, समुद्राइतकाच गूढ. तरीहि हवाहवासा वाटणारा. तो बरोबर असला कीं वाटायचें त्याची संगत कधीं सोडूच नये. तो नसला कीं त्याच्या सहवासांत जाण्याची अनावर ओढ मनाला लागायची. त्याच्या व्यक्तित्वाला अद्भुततेचा मुलामा चढलेला होता. त्याच्या बोलण्यांत मनं भारून टाकायची किमया दडलेली होती. त्यानें मला झपाटलें होतें.



बोलण्याचें काम बहुधा दयार्णवच करायचा. एखादी घटना व त्यांतून त्याने निष्पन्न केलेलें जीवनविषयक तत्वज्ञान हाच त्याच्या बोलण्याचा विषय असायचा. समुद्र व आकाश यांच्या मिलनाचा देखावा पाहून तो म्हणायचा, "जयंत, आपलं आयुष्य अगदी असंच आहे नाही ? केवळ आभासमय. निव्वळ मृगजळ. मनुष्याला ध्येयप्राप्ति झाल्यासारखें वाटतें तेव्हा तो आभास मात्र असतो. प्रत्यक्षांत मात्र मूळ ध्येय प्राप्तीपासून सहस्त्रयोजनं दूर असतं."

तो असं कांहीं बोलायला लागला कीं त्याच्या चेहऱ्यावर अवर्णनातींत व्यथेची छाया पसरायची. वाटायचं, या देखण्या, उमद्या स्वभावाच्या माणसाला या व्यथेचं ग्रहण लागलं आहे तें दूर करावं. पण असं क्षणभरच वाटायचं. मग वाटायचं कीं ही व्यथा आहे म्हणून त्याच्या जीवनाला अर्थ आहे.

त्याच्या बोलण्यांतून वेळीं अवेळीं जें जीवन-विपयक तत्वज्ञान प्रकट होत असते, ते या व्यथेंतूनच होत असते. या व्यथेच्या फुलां-नीच एरव्ही जरड भासणाऱ्या त्याच्या व्यक्तित्वाला सुकुमारता प्राप्त करून दिली आहे.

असं वाटायला लागलं कीं मन पुन्हा त्याच्या संभाषणांत गुरफटून जायचें.

आजदेखील असंच झालं.

आम्ही जेथें बसलों होतो तेथपर्यंत समु-द्राच्या लाटा सरपटत येत होत्या. व आमच्या पायाशी समुद्रफेस जमा करून पुन्हा पर-तत होत्या. त्या येणाऱ्या लाटांनीं एक खेकडा आमच्या समोर आणून सोडला. त्याला तेथें रेतीवरच सोडून लाट आली तशी परत गेली. चांगला मुठीएवढ्या आकाराचा तो खेकडा होता. त्याचा रंग दाट मद्यासारखा होता. त्याची नजर आमच्यावर खिळली होती. व ती कायम ठेऊन तो आमच्यापासून दूर वांकडा-वांकडा चालला होता. केवढा रुबाब होता त्याच्या चालीत! साऱ्या जगाचा स्वामी असल्याची ऐट त्याच्या चालण्यांत होती! आपल्या सौंदर्याचा अभिमान असणाऱ्या एखाद्या तरुणीसारखा थाट त्याच्या हाल-चालींतून प्रकट होत होता. तेवढ्यांत आणखी एक लाट आली आणि रेतीवर रिती भका-सता ठेऊन गेली. त्या लाटेबरोबरच मघा-चचा खेकडासुद्धा नाहीसा झाला होता!

ते पाहून दर्याणव हंसला.

'काय झालं रे हंसायला ?" मी विचा-

*....बोलतां बोलतां तिचा आवाज घोगरा झाला व डोळ्यांत पाणी उंभ झालं.... तिच्या त्या शेवटच्या वाक्याने मात्र माझ्या अंगावर कांटा उभा राहिला. कारण....माधुरी जर निघून गेली होती तर मग ही कोण उभी होती........? एक गूढ निर्माण करणारी पण वाचनीय कथा........*



## *प्रजासत्ताकदिनाच्या चालत्या बोलत्या प्रतिकाला प्रणाम!*

आजच्या प्रजासत्ताकदिनाच्या शुभ प्रसंगीं लोकशाहीच्या सच्चा पुरस्कर्त्याला उदंड आयुष्य लाभो हीच दीपावलीतर्फे शुभेच्छा!

---

"क्षणापूर्वी इथं खेकडा होता तो तूं पाहिलास ?" तो म्हणाला.

"हो. पण त्याचं काय आतां. तो तर गेला. पाण्याबरोबर वहात," मी म्हटलें.

"त्याचंच मला हंसूं आलं. आपलं आयुष्य देखील या खेकड्यासारखंच नाहीं कां ? जीवनाची एक लाट आपल्याला या मर्त्य लोकांत आणून सोडतें. त्या लाटेचे अस्तित्व विसरून आपण स्वत:चें आयुष्य जगूं लागतो. केवढा दिमाख असतो त्या जगण्यांत! इत-रांच्या अस्तित्वाची जाणीवदेखील त्यांत विसरली जाते. तेवढ्यांत दुसरी लाट येते व आपलें अस्तित्वशून्य करून निघून जाते. तो खेकडा पाण्याबरोबर वाहून गेला पण त्यापूर्वीचा त्याचा डौल आठवून मला हंसूं आलें." दर्याणव म्हणाला व बोलतांबोलतां एकदम थांबला. संगीताची मैफल ऐन रंगांत आली असतांना तंबोऱ्याची तार मध्येंच तुटावी व रंगाचा बेरंग व्हावा तसें मला झालें.

तो ज्या दिशेनें पहात होता त्याच दिशेला माझी नजर अभावीतपणें वळली व तेथेंच खिळली.

आमच्या अगदी समोरून पाण्यांत पाऊलें भिजवीत व दोन्ही हातांनी ओचे वर धरून एक स्त्री चालली होती. जातां जातां मधेच ती थबकली होती व दर्याणवकडे पाहून हंसली होती. तिला पाहतांच दर्याणवच्या चेहऱ्या-



अनुक्रमणिका

वर क्षणभर भीतीची छाया पसरलेली मला दिसली, पण ती क्षणभरच टिकली. मग त्यानें देखील तिच्याकडे पाहून ओळखीचें हास्य केले. तेवढ्यांत तिची नजर माझ्यावर पडली व तिच्या चेहऱ्यावरील हास्य मावळलें. क्षणांतच ती समोरच्या गर्दीत नाहीशी झाली.

तिला नाहीशी झालेली पाहतांच दयार्णव पण उठला व 'माफ कर हं, मी जरा जाऊन येतो' असें म्हणत तोसुद्धा त्या गर्दीत नाहीसा झाला!

मी तिला क्षणभरच पाहिलें, पण त्या क्षणांतच तिच्या चेहऱ्यावरील असामान्यत्व माझ्या प्रत्ययास आलें. इतकी देखणी स्त्री आजवर माझ्या पाहण्यांत आली नव्हती. ती अशक्त दिसत होती. नुकत्याच आजारांतून उठल्यासारखा तिचा चेहरा फिकट वाटत होता. तिची मान उभट होती व तिच्या व्यक्तित्वाला उठाव आणीत होती. तिचें काळेभोर डोळे विलक्षण तेजस्वी दिसत होते. तिच्या शरीरांतील सारे चैतन्य तिच्या नजरेंत सामावल्यासारखें वाटत होतें. त्या तेजानें तिच्या चेहऱ्यावर विलक्षण झळाळी चढली होती. त्या झळाळीतूनहि तिच्या चेहऱ्यावरील आर्तता स्पष्ट दिसत होती. तिला पाहतांच दयार्णवच्या चेहऱ्यावरील व्यथेची छाया पुसली गेली होती व आजपर्यंत माझ्या दृष्टीस न आलेली अधीरी उत्सुकता त्याच्या चेहऱ्यावर उमटली होती. त्याच्यांत त्या स्त्रीच्या दर्शनानें झालेला बदल मला जाणवला होता व त्यावद्दल मी त्याला विचारणार होतो, पण त्यापूर्वीच तो तिथून निघून गेला होता.

या स्त्रीचा दयार्णवचा काय संबंध असावा असा विचार करीत मी पण समुद्र-किनाऱ्यावरून घराकडे परतलो.

• • •

दयार्णव हें खरोखरीच एक गूढ होतें. तो नाग पूरचा राहणारा. महाराष्ट्र राज्य झाल्यामुळें त्याला आपल्या मनाविरूद्ध मुंबईला यावें लागलें होते. त्यामुळें म्हणा कीं इतर कांहीं कारणांमुळें म्हणा तो फारसा कुणाशीं बोलायचा नाही. साऱ्यांपासून नेहमी अलिप्त राह्यचा. त्याची अन् माझी पहिली भेट झाली आमच्या क्लबमध्यें. त्या दिवशी तो कुणा मित्रा बरोबर बॅडमिंटन खेळावयास आला होता. त्याचे फूटवर्क, बॅड्राईव्हज् व खेळण्याची शैली एखाद्या कसलेल्या खेळाडू प्रमाणें होती. त्याचा खेळ व त्याचें व्यक्तिमत्व यांनी मी त्याच्याकडे आकर्षिला गेलो. त्या दिवशींच आम्ही परस्परांचे मित्र बनलो. त्यानंतर आमचे मित्रत्वाचे पाश अधिकच दृढ होत गेले. आमची दुक्कल सर्वपरिचित झाली होती. इतकी कीं आमच्यापैकीं एक गैरहजर असला कीं लोक त्याची विचारपूस करायला लागायचे. पण इतकें असूनहि त्याने स्वत:विषयीं जितकी गौप्यता राखायची होती, तितकी राखली होती. त्यामुळें तो माझ्याविषयीं खडान्‌खडा माहिती देऊं शकला असता. मला मात्र त्याचें नांव व ऑफिस ह्या खेरीज याची कांहींच माहिती नव्हती. प्रयत्न करूनहि स्वत:च्या पूर्वायुष्यावर पडलेला गूढ पडदा तो दूर सारीत नाही हें ध्यानांत आल्यावर मी तो विषयच काढणें सोडून दिलें होतें.

स्वत:विषयीं गौप्यता राखण्याच्या वृत्तीमुळें त्याने आज मला मोठ्या पेचांत टाकलें होते. चौपाटीवर तो मला अचानक सोडून गेल्या दिवसापासून त्याची माझी गांठभेट कित्येक दिवसांत झाली नव्हती. चौपाटीवर, क्लबमध्यें किंवा लोकलमध्यें होणाऱ्या आमच्या भेटी सहसा चुकायच्या नाहीत. पण त्यादेखील आठपंधरा दिवस झाल्या नाहींत. त्याच्या ऑफिसमध्यें चौकशी केली तेव्हां कळलें कीं तो त्यादिवसापासून ऑफिसांत सुद्धां आला नव्हता. आमचा दाट परिचय असूनहि दयार्णवने मला कधीं आपल्या घरीं नेलें नव्हतें. त्यामुळें त्याला शोधून काढण्याचा तो मार्गसुद्धां बंद झाला होता.

तो पंधरा दिवसांत मला भेटला नव्हता म्हणूनच मला त्याच्याविषयीं काळजी लागली होती. त्यादिवशीं चौपाटीवर ती स्त्री दिसल्यापासून तो अचानक नाहीसा झाला होता, त्यामुळें माझें मन त्याचा संबंध त्या स्त्रीशी जोडीत होतें. पण ती स्त्री दिसली म्हणून त्यानें नाहीसें होण्याचें कांहींच कारण नव्हते. उलट त्याने तिची ओळख करून द्यायची होती. तिचे व त्याचें न सांगण्यासारखें संबंध असले तरी ते केव्हांतरी उघड होणारच होते. कारण तो कांहीं कायमचा नाहीसा होऊन शकणारच नव्हता. तो ज्याअर्थी नोकरी करीत होता, त्याअर्थी पैशाची गरज त्याला होती. मग त्यानें नाहीसें कां व्हावें? जें केव्हांतरी उघड होणार त्याला कांहीं दिवसांकरितां दडवून त्याचा काय लाभ होणार होता? विचार करूनसुद्धा ह्या प्रश्नांची उत्तरें मिळत नव्हती. व त्यामुळें मन बेचैन झालें होतें.

एखाद्या गोष्टी विषयीं मनांत तीव्र इच्छा उत्पन्न झाली कीं ती गोष्ट घडते म्हणतात. निदान मला तरी तसा अनुभव आला होता.

त्यादिवशी संध्याकाळी बसनें मी बॉबे-सेन्ट्रलला चाललो होतो. बस मराठा-मंदिराजवळ आली आणि तेथेच मला दया दिसला. त्या दिवशी चौपाटीवर दिसलेली तरुणी त्याच्याबरोबर होतीच! मी बसमधूनच त्याच्याकडे पाहून त्याचे लक्ष

## कल्पनेतहिं खोटीं वाटेल अशीं पण नव्या वर्षांत घडलेलीं सत्य घटना

**केनेडी यांच्या खूनांत, बचाव करतांना मारल्या गेलेल्या एका पोलीसाच्या विधवेला आणि मुलांना, लोकांनी आपण होऊन मदत केली आहे. त्यांत दिल्लीहून आलेली कांहीं रूपयांची मदतहि आहे. एकूण रोख रक्कम किती म्हणाल? तर.... १,८६,६०८-पौंड इतकी प्रचंड रक्कम लोकांनीं आपण होऊन तिला दिली. शिवाय अनेक दुकानदारांनीं मुलें २१ वर्षांचीं होईतोपर्यंत कपडे, अन्न, इत्यादि देण्याचें कबूल केले आहे. एका दुकानदारानें तिचे गहाण असलेले घर सोडवून तिला बक्षीस दिलें आहे. आणि ह्याहून विशेष म्हणजे त्या माऊलीनें फक्त ३५ पौंडच (वर आठवड्याला तिच्या नवऱ्याला जेवढा पगार मिळत होता तेवढाच) घेण्याचे ठरविले आहे.**

वेघण्यासाठीं हात हलवला. तोसुद्धा माझ्याकडे पाहून हंसला. पुढच्या स्टॉपवर बस थांवतांच मी पटकन उतरलो व मागें वळून मराठामंदिरच्या रोखानें जाऊं लागलों. तेथें पोचतांच मला आश्चर्यानें वेड लागायची पाळी आली. दया एकटाच तेथें उभा होता. क्षणापूर्वी मी पाहिलेली स्त्री मात्र नाहिशी झाली होती.

"किती दिवसांनी भेटतो आहेस दया," त्याचा हात प्रेमभरानें दाबीत मी म्हटलें, तुला कल्पना नसेल मला किती आनंद झाला आहे याची. गेले पंधरा दिवस मनाला जो घोर लागला होता तो तुझी आतां भेट होतांच दूर झाला. कुठें गेला होतास बाबा?"

"सांगेन, सारं कांहीं सांगेन तुला" दया म्हणाला. "चल खोलीवर जाऊं."

दया निघाला. त्याच्यापाठोपाठ मी पण निघालों. दयानें त्याच्या खोलीवर जाण्याची गोष्ट काढली त्यामुळें मला समाधान वाटलें. दया आपल्याभोंवतीचें गूढतेचे आवरण हळूंहळूं दूर करायला लागला होता एकूण! तरीसुद्धां मला राहवेना.

"मी बसमधून तुम्हा दोघांना पाहिलें. ती कोण? मी येईपर्यंत ती कुठें नाहिशी झाली?" मी त्याला विचारलेंच

"हें सारं मी तुला सांगितलंच पाहिजे कां?" दयानें विचारलें. त्याचा स्वर जड झाला होता. चेहऱ्यावर व्याकुळता स्पष्ट दिसत होती.

"हो हें सारंच काय याहून अधिक तूं मला सांगायला हवं आहेस. किती तरी गोष्टी तूं माझ्यापासून लपविल्या आहेस. तूं कुठला आहेस? तुझं लग्न झालं आहे कीं नाहीं? घरीं कोणकोण असतं? या साध्या गोष्टी देखील तूं मला सांगितल्या नाहीस. तरी देखील मी आजपर्यंत कधीसुद्धा त्याविषयीं आग्रह धरला नाही. पण आज मात्र मला वाटायला लागलं कीं या साऱ्या गोष्टींचा सोक्षमोक्ष लावावयाचाच. तुझ्याभोंवती असलेल्या गौप्यतेचा पडदा टराटरा फाडून तुला खऱ्या स्वरूपांत पहायचें, नाहीतर तुझ्याशी असलेले मैत्रीचे संबंध तोडून त्या गूढतेपासून दूर तरी जायचें," मी बोलत होतो अंतर्यामी सतत दडपून टाकलेल्या भावना आज अचानक वर उफाळून आल्या होत्या व त्या मजकडून सारे वदवून घेत होत्या. मला स्वतःला ओठांतून निसटणारी कठोर शब्दांची मालिका मधूनच तोडून टाकावी असें वाटत होतें. पण आज ओठांतून निघणारे शब्द माझे नव्हते माझी भावना जणूं शब्दरूप धारण करीत होती व तिला बांध घालणें मला अशक्य झालें होतें.

माझ्या या भाऱ्यामुळें दया गोंधळून गेला. आजवर मी त्याला असें कांहीं बोललो नव्हतो म्हणूनच माझें बोलणें त्याला लागलें असावें. त्याच्या चेहऱ्यावर अपराधीपणाचा भाव स्पष्टपणें अंकित झाला होता.

"जयंता, मला तुझ्या भावना कळतात. तुझ्या रागामागें माझ्याविषयींच्या प्रेमाची जी भावना दडली आहे ती मला जाणवते आहे. पण तरीसुद्धा ज्या प्रश्नांची उत्तरं तूं चाहतो आहेस, ती मी अजूनहि तुला देऊं शकत नाही. तरीसुद्धा तूं हें ध्यानांत ठेव कीं तें सांगायची वेळ जेव्हा येईल तेव्हा मी प्रथम तुझ्याकडे येईन." दयार्णव म्हणाला व एका इमारतीसमोर उभा राहात तो म्हणाला, "हें आलंच आपलं ठिकाण."

आधुनिक पद्धतीची ती एक प्रचंड इमारत होती. मोठ्या प्रमाणावर माणसांसाठीं बांधलेलें ते एक खुराडेंच होतें. पांच दहा जिने चढून गेल्यावर दहाबारा ब्लॉक्स् ओलांडल्यावर गॅलरीच्या एका टोकाला असलेल्या






अनुक्रमणिका

दयानें चहा केला व चहा पीत पीतच तो माझ्याशी बोलत बसला. माझ्या ऑफिस-विषयीं, माझ्या एकंदर कार्यक्रमाविषयीं तो बोलत होता. मी त्याच्या प्रश्नांना उत्तरं देत होतो, उत्तरं देण्यापुरतंच बोलत होतो. गेल्या पंधरा दिवसाच्या त्याच्या गैरहजेरीचें स्पष्टीकरण देण्यास दयानें नकार दिल्यावर माझ्या दृष्टीनें त्याच्याशी बोलण्याजोगा एकहि विषय उरलेला नव्हता.

मी जाण्यासाठीं उठलो.

" आतां पुन्हा केव्हा भेट ? " मी उठतच म्हटलें.

" लवकरच. अजून सात आठ दिवस मी ऑफिसांत जाणार नसलो तरी एखाद-दिवशीं क्लबमध्यें यायचा विचार आहे. बरेंच दिवसांत खेळ झाला नाही, म्हणून चैन पडत नाही. तेथें आलो कीं भेट होईलच. मघां तूं जें प्रश्न विचारलेस त्यांची उत्तरं सध्यातरी मला देता येत नाही. त्याबद्दल मात्र तूं माझ्यावर रागावूं नकोस हं. प्लीज, " माझा हात प्रेमभरानें दाबीत दया म्हणाला.

त्यावर कांहीं न बोलतां त्याच्या हातांतून हात सोडवून घेत मी तेथून निघालो. खोल्यामागून खोल्या मागें टाकीत मी जिन्याशी येऊन पोचलो. मनांत असंख्य विचारांचा गोंधळ निर्माण झाला होता. अनेक प्रतिमा मनांत घोंघावत होत्या. पण त्या प्रतिमांत संगति नव्हती. चौपाटीवर भेटलेली स्त्री, क्षणापूर्वी रस्त्यावर दिसलेली तीच स्त्री, दयाचा कांहींतरी लपविण्याचा चाललेला आटोकाट प्रयत्न—या छाया डोळ्यासमोर नाचत होत्या. त्यांच्यांतून सुसंगत असें चित्र रेखाटतांना माझी कल्पनाशक्ति पांगळी पडत होती. त्यामुळें मन हैराण झाले होते.

विचारमग्न अवस्थेतच मी जिना उतरलो. जिन्याच्या तोंडाशीच आणखी एक मित्र भेटला. त्याच्याशी बराच वेळ बोलत बसलो, त्याचा निरोप घेऊन रस्त्यावर आलों तोंच माझ्यासमोरून झरकन् कुणीतरी निघून गेले. एक क्षण त्या व्यक्तीनें माझ्याकडे पाहिलें. त्या क्षणांत तिच्या चेहऱ्यावर प्रथम आश्चर्य व नंतर भीतिची भावना प्रकट झालेली मी पाहिली. चुटपुटता त्या

(पान ५८ वर)

खोलीशी आम्ही आलो.

दयानें पुढे होऊन खोली उघडली व तो आंत शिरला. त्याच्यापाठोपाठ मी पण आंत गेलो. आंत शिरतांच मी प्रथम चौफेर नजर फेकली. खोलीतील नीटनेटकेपणानें माझें मन प्रसन्न झालें पण तरीसुद्धा माझी थोडी निराशाच झाली. दयाचे फारसे सामान असलेले दिसत नव्हते. एक पलंग, खिडकीशी टेबल खुर्ची, टेबलावर मोजकी चार पुस्तकं, भिंतीवर एक आरसा, एक दोन कॅलेंडर व एका कोपऱ्यांत एक मलीमोठी ट्रंक—वस्स एवढेंच सामान त्या खोलीत होते. त्या सामानांत दयाविषयीं आणखी कांहीं माहिती मिळूं शकेल असं कांहीं नव्हतं. एखादा ग्रुप फोटो, एखादा नातलगांचा फोटो, निदान मी जिचे दोनवार पाहिली त्या स्त्रीचा तरी फोटो त्या खोलीत असावयास हवा होता. तसा एकहि फोटो त्या खोलीत मला आढळला नाही. एखादी स्त्री त्या खोलीत पूर्वी येऊन गेल्याच्या कसल्याच खाणाखुणा मला आढळल्या नाहीत. त्या खोलीतला नीटनेटकेपणाच फक्त संशयास्पद होता. त्यामुळेंच एखाद्या स्त्रीचा हात त्या वस्तूंवरून फिरला असावा असें वाटत होतें. दयाच्या खोलीत येऊनहि अपेक्षापूर्ति न झाल्यानें मी निराश झालो.

कांहीं तरी बोलावयास हवें म्हणून मी म्हटलें, "तुझी खोली तर झकास आहे. इमारतीच्या एकावाजूला असल्यामुळें वर्दळीचा त्राससुद्धा कमी आहे. शिवाय हवेशीर आहे. "

" हो ना," दया म्हणाला. "निदान खोलीच्या बाबतींत तरी मी भाग्यवान आहे. बरं तूं काय घेणार, चहा कीं कॉफी ? "

" चहा चालेल, " मी म्हटले.

STUDIO SARJERAO




निरोगी व बाळसेदार मुलें सर्वांनाच आवडतात. म्हणूनच त्यांना दृष्ट लागते असें म्हणतात! मुलांना कॅलशम व्हिटॅमिन डी भरपूर प्रमाणांत मिळालें तर त्यांच्या शरिराची वाढ चांगल्या प्रकारें होते, हाडांना मजबूती येते, दांत सुलभपणें येतात, रक्ताची वाढ होते. आणि शरिरांतील प्रतिकारशक्ती वाढतात, बालक सुदृढ होतें. साण्डू रिकेटयूर यासाठीं अत्यंत उपयुक्त आहे

**साण्डू**

**रिकेटयूर**

मुलांना वेळींच द्या



दत्तात्रेय कृष्ण साण्डू ब्रदर्स, चेंबूर, प्रा. लि.
चेंबूर – मुंबई

### पूर्व कथासूत्र....

**गांवांत ग्रामपंचायतीच्या निवडणुकांचा प्रचार जोरांत सुरूं झाला होता. अण्णागुरुजीच्या प्रचार सभानांहि जोर आला होता. इकडे त्यांच्या विरूद्ध प्रचारहि जोमांत सुरूं होता. बंड्याहि प्रचाराला लागला होता. द्वारका तर आपल्या प्रयत्नांत गुंतला होता. अण्णागुरुजी कधी नाही ते निवडणूक लढवायला पुढें सरसावले होते. बामणाविरूद्ध ही निवडणूक त्यांना लढवायची होती. त्यामुळें तर त्यांना भलताच उत्साह आला होता. आणि लोकांतहि नवीन उत्साह ते वाढवीत होते...**

**आतां पुढे वाचा....**

## १६

**पुढं** आठ दिवस गांवांत नुसती धमाल उडून राहिली. पंचायतींच्या निवडणुका यापूर्वी झाल्या किती नि गेल्या किती ! तिकडे चुकून कोणाचंहि लक्ष जात नव्हतं. घरचं खायचं आणि मोफत पंचायतीची महारकी करायची–लोकांना कौतुक नव्हतं. नाहींतरी एरव्हीसुद्धां हें करतां येत होतं. आणि गांवचीं लोकं तेंच करीत होती कीं !



—श्रीराम कामत

पण ही निवडणुक अशी तशी नव्हती. कधीं नाहीं तो अण्णागुरुजी उभा राहिला होता. चालू प्रथा मोडून बामणांविरुद्ध म्हातारा जागा लढवीत होता. कारण गांवाचं त्याला भलं करायचं होतं. वाटोळं नाहीं. तें बामणांनी करावं. त्यांनाच करतां येतं. इतकी वर्षं नाहीतरी त्यांनी दुसरं केलंच काय ?

वणवा लागावा तसं गांव पेटलं होतं. अण्णागुरुजींनी तें पेटवलं होतं. प्रत्येक घर आणि खोपटं त्याचा पाय लागतांच धडपडून उठत होतं, खडबडून जागं होत होतं. नाहीतरी दुर्वास हा ! शाप द्यायचा. कमरेला पंचा, तेवढाच. बाकी उघडा. गांवच्या प्रत्येक उंबरठ्यावर देणेकऱ्यासारखा उग्र चेहऱ्यानं तो उभा रहात होता. एक कांठी असायची हातांत आधाराला. पायांत वहाणासुद्धां नसत. कुणी विचारलंच तर म्हणे, "मुद्दाम ठेवून दिल्यांत तोंड फोडायला, द्वारक्याचं." आणि वर हाः हाः करून आपणच मोठ्यानं हसे.

भाषणं करायची नाहीतरी खाजच या म्हताऱ्याला. निवडणुकीच्या या निमित्तानं तो ती भागवून घेत होता. प्रचारसभा म्हणे ! आवाठ्याआवाठ्यांतून त्यांचा दणका लावला होता त्यानं. गोळे साहेबाची भरपूर मदत. मग कशाचीहि ददात नव्हतीच. सांजला सभा होत. बत्त्यांच्या झगमगाटांत. कंपनीचीं माणसं असायचीं दिमतीला. तीं गाणीं पोवाडे म्हणत, नकला करीत आणि सभेला गर्दी जमवीत. आणि मग अण्णागुरुजींचं तुफान भाषण होई.

बाकी बोलणारा मोठा फर्डा खरा. इतकं वय झालेलं, तरी वाणी कशी ठोक, टाकीचे घण घालावेत अशी. पाल्हाळ लावी, पण मुद्दा न सोडतां. स्वभावानं तसा नाटकीच तो. तशांत विषय पडला हवातसा. म्हणजे त्याचाच. त्याच्या दुःखांचा, त्याच्यावर झालेल्या अन्यायाचा, त्याच्या खच्ची झालेल्या व्यक्तिमत्वाचा. उभं आयुष्य म्हताऱ्यानं जे भोगलं, अनुभवलं, कडू तोंडानं गिळण्याचा आणि पचविण्याचा प्रयत्न केला तेंच—होय, तेंच त्याच्या तोंडून बाहेर पडत होतं. पोट तिडिकेन, जळजळून, मळमळून. शब्द जरा तिखट, कडक.

अर्थात् या जहरी प्रचाराचा गांवच्या लोकांवर व्हायचा तो परिणाम झालाच.

अण्णा गांवांत त्यांना सांगे, "अरे मला मत द्या. तुम्हाला मी पैसा मिळवून देतो. तुमचाच पैसा आणि तरी तुम्हाला जो दिसत नाही. मधल्यामध्यें हीं गिधाडं खातात. ओकवून घेतों...."

नुसत्या टाळ्यांच नाहीं, तर म्हातारा लोकांचीं मनंहि जिंकीत होता. त्यांच्या काळजाला हात घालून त्यांना तो गदगदां हलवून सोडत होता. त्यांच्यांत खळबळ माजवीत होता, असंतोष चेतवीत होता. त्यांच्या श्रद्धा ओरबाडत आणि निष्ठेचीं लक्तरं पिंजत होता.

तिकडे बंड्या नांवरानं वेगळंच सत्र चालवलं होतं. रस्त्यांत जो दिसेल त्याला हा बंड्या सांगत सुटला होता, "अरे, मी आणि द्वारक्या वेगळे नाही. भाऊंचा आग्रह निवडणुकीला मीच उभं रहावं. पण मी त्या द्वारक्याला उभा केला. तेंव्हा आतां त्यालाच मतं द्या. काय? आणि याद राखा. द्वारकानाथ पडूं दे तर खरा—मग माझ्यासारखा वाईट माणूस दुसरा कोणी नाही. काय समजलांत तुम्ही ? आग लावून घरंदारं बेचिराख करीन. पडा उघड्यावर. वसंत बतलाचं दुकान तुम्हाला बंद. मरा उपाशी. खंडाला आमच्या

जमिनी मिळणार नाहींत. जा, खाणींत जाऊन खडी फोडा. मांचोद, खाणार आमचं—मत त्या देवळयाला काय? खासा न्याय—"

वंड्याला जाब देण्याच्या भानगडींत कोणी पडत नव्हत. अर्थ नव्हता. लाचार तोंडानं आणि जिभेला गांठ घालून लोकं ऐकून घेत. आणि मग संध्याकाळीं अण्णागुरुजी जाहीर सभेंत वंड्याच्या या धमक्यांचा समाचार घेई. त्याच्याच भापेंत. हा असा. हातांतील कांठी उगारून जोरजोरानं म्हातारा ओरडे, "बाप उतरला पाहिजे याचा स्वर्गांतून. तिकडे गेलाच असला तर ! नाहीतर असायचा नरकांत. असूं दे विचारा ! आपल्या कर्मानं गेला. काय करणार ? तर हा राहिला आहे. आहे हिंमत तर ये म्हणावं. हिथं, समोर. आणि सांग अण्णाला. अरे बैलोबा, या जमिनी कोणी दिल्या रे तुला ? दाखव तुझ्या रवळनाथाचा ताम्रपट. त्या गिळल्यास लेका. आमच्याच. तूं नाही. आज्यापणज्यांनी तुझ्या त्यांची झाली माती. तेव्हां आतां विचार मलाच. मी सांगतों. घरादारांना आगी लावणार म्हणे, उपाशी मारणार. . .आं ! कोणाला रे ? माझ्या गांवाला. गांडूळ तूं. गांव मुतला तरी वाहून जाशील, पाणी पाणी होईल. मित्रहो, तुम्हीच सांगा याला काय म्हणून माणूस म्हणायचं ? अरे बैल हा. माजला आहे, शिंगं रोखून धांवतो अंगावर हः हः. . . . ."

अण्णागुरुजी उभं गांव दणाणून टाकी.

पण सगळींच बामणं बंड्या नावरासारखी आचरट नव्हतीं, आधींच बोंब मारणारीं नव्हतीं. काळ बघून कळ काढणं आणि संधि बघून झडप टाकणं त्यांना चांगलं ठाऊक होतं. शिवाय भाऊ कुळकर्ण्याच्या ओटीवर रोज बैठका भरत होत्याच. तासन् तास खलबंत चालत आणि धोरणं ठरत.

यंदा पीकपाणी तसं बरं होतं. तरीसुद्धां कुळवाड्यांना घरामागं पायली-पायली भात भाऊ कळकर्ण्यानं वांटलं. या धोरणाचा एक भाग म्हणूनच.

म्हणजे कुळवाड्यांनासुद्धां अपरूप झालं.

बरोबर माथ्यावर भाताचं पोतं घेतलेला एक गडी घेऊन भाऊ जातीनं भात वाटत घरोघर फिरला. लाल जरीचा रूमाल, कपाळाला गंधाचा आडवा टिळा, पिवळा गुडघ्यापर्यंत लांब कोट. भाऊला या पोशाखांत कुळवाड्यांनी कधीं पाहिलाच नव्हता. डोळ्यावर विश्वास बसेना त्यांचा. बोलतांना जीभ अडखळली, "भाऊ तुम्ही ? फक्त निरोप धाडायचा होता. धांवत आलों असतों."

"तुम्ही येतां रे, रोजच ! वाटलं आज आपण जावं. गांवचीं लोकं तुम्ही. आणि आमची प्रकृति आतां ही अशीच. हार्टचा रोग ! काय ? कधींहि राम म्हणूं. नेम नाही ! तेव्हां म्हटलं वरची चिठ्ठी येण्यापूर्वीं तुम्हा मंडळीचा एकदां प्रेमाचा निरोप घ्यावा.'

भाऊ हयातींत प्रथमच या लोकांशीं हंसून बोलला होता. बरोबरच्या गड्याला पायलीभर भात काढायला सांगून त्यानं ते प्रत्येकाला पोंचतं केलं. आणि पुन्हां एकदां हंसून म्हटलं, "आजचा दिवस भाऊच्या अन्नावर काढा. नाहीतरी त्याच अन्नावर वाढलांत रे ! काय ? मला बरं वाटेल. . . ."



त्या दिवशीं अण्णानं भाऊ कळकुर्ण्याच्या घरासमोर महादेवाच्या देवळांत मुद्दामच सभा घेतली. अर्थात मग भाषणांत त्यानं ही गोष्ट काढलीच. टाहो फोडून सांगितलं, "आनंद आहे ! काय, आनंद आहे ! आपणहून देताहेत ना ? घ्या-घ्या ! अपमान करूं नका. अरे कांहीं उपकार नाही कोणी करीत. तुमचंच आहे तें. काय मिळेल तें पदरांत पाडून घ्या. आणि तरीहि हात पुढंच करा ! मिळणार, सगळं मिळणार. हा अण्णा मिळवून देणार. आणि मित्रहो, याहूनहि अधिक आनंदाची बातमी आता सांगतो. कळली आणि ह्या अण्णाला हर्षवायु झाला. आटोपणारच होतो. पण आठवण झाली, माझ्या गांवच्या लोकांना ती ठाऊक नाही. कसचा मरतो मग ? वांचलो, तुम्हाला ही बातमी सांगायला जिवंत राहिलो. अरे, आपल्या महामायेच्या देवळाला सोन्याचा कळस चढणार. तो घारलायचं गोळेसाहेबानं कबूल केलं आहे. त्यासाठीं कंपनी तीन चार लाख रुपये खर्च करणार. ऐकलंत का ? आतां बघा, प्रत्यक्ष बघाच. पांच कोसावरूनसुद्धां दुनिया बघत राहील—दिसेलच तो, माझ्या महामायेच्या देवळावरील सोन्याचा कळस. . . ."

सोन्याच्या कळसाची अण्णाची ही आरोळी तिकडे भाऊ कळकुर्ण्याच्या ओटीवर भरलेल्या बामणाच्या कांग्रेशीलासुद्धां नीट ऐकूं गेली. आणि तसे एकेकाचे चेहरे बघण्यासारखें झाले. किंवा त्या पडलेल्या खप्पड चेहऱ्यांकडे कोण बघेल म्हणा ! बघण्यासारखं कांही शिल्लक राहिलं नव्हतं. म्हणजे निवडणुकीचा निकाल जवळजवळ लागल्यासारखाच होता. माणसानं करण्यासारखं आतां कांहीं उरलं नव्हतं.

पण अजून सैतान निराश झाला नव्हता. उलट तो चेकाळला, चवताळला. वाटच बघत होता तो कीं हीं माणसं स्वतःला विसरून





अनुक्रमणिका

कधीं त्याच्या स्वाधीन होतात. आणि—होय ! तशीं तीं झालीं. नाइलाज होता त्यांचा. अगदी.

आणि मग वर खाणींत अपघात सुरू झाले.

मॅंगनीज भरतां भरतां एक ट्रक कड्यावरून घसरला, उलटला, आणि गडगडत खालीं खोल दरींत पडला. कंपनी म्हणते, फक्त ड्रायव्हरच चेंगरून मेला. गांवांत वातमी होती, दहा माणसं दगावलीं. त्यांचीं हाडंसुद्धा सांपडलीं नाहींत. आणि ही गोष्ट कंपनी लपवून ठेवते.

निवडणुका उद्यां, तर आघल्या दिवशीं शनिवारला साडेचार वाजतां पुन्हा अपघात झाला. या खेपेला खुद्द खाणीवरचें लोक काम करीत होतीं तर अचानक स्फोट होऊन वाजूची दरड कोसळली होती.

गांवांत एकच हाकाटी उठली. शेंकडों माणसं मेलीं अशी अफवा होती. माती उपसून मुडदे काढायचं काम चालूं होतं. आणखीं दोन दिवस तरी तें चालणार होतं असं द्वारकानाथ कुळकर्णी सांगत होता. परिस्थिति काय आहे ती प्रत्यक्ष डोळ्यांनी पहावी म्हणून अपघाताच्या ठिकाणी तो धांवला होता. पण कंपनीच्या मॅनेजरनं हरकत घेतली. रामप्पा शेट्टीकडून मारपीट करून द्वारकानाथाला घालवून दिलं. रत्नागिरीच्या कलेक्टराला या अपघाताची चौकशी व्हावी अशी त्यानं तार ठोकली आहे म्हणे.

रात्री आठ वाजतां महामायेच्या भव्य पटांगणांत अण्णागुरुजीचं भाषण होतं. ती अखेरची प्रचारसभा. अपघाताच्या वातमीनं लोकं खवळलीं होती, विथरलीं होती. कंपनीची वाजू घेतो म्हणून अण्णावर सुद्धां ती एकदम फिरलीं होतीं. ह्या अपघाताचा जाव विचारण्यासाठीं सभेला लोकांनी गर्दी केली. पटांगण नुसतं फुलून गेलं.




अण्णागुरुजी आला. कांठी टेकतच. मान हलवीत टेवलापाशीं तो उभा राहिला. एकदाच असेल, गर्दीकडे त्यानं पाहिलं. आणि म्हातारा खो: खो: हंसत सुटला.

"अरे हंसतोस तें थोवाड आहे कुठं तुला अण्णा ?" गर्दींतून एकानं विचारलं.

"कशाला मतं मागतोस ? आम्हाला असं गाडायला ? गांवाची मसणवट करायला ? "जमावानं प्रश्नांचा भडीमार सुरू केला.

तरीहि म्हातारा हंसतच होता. त्याला सगळी गंमतच वाटत होती.

"दे, उत्तर दे देवळ्या ?" लोक उसळून ओरडलीं.

"देतों वावानूं, देतों." अण्णागुरुजी त्यांच्याहि पेक्षा आवाज चढवून ओरडला. "म्हणूनच तर उभा आहे हिथं. फक्त दोनच प्रश्न विचारतों. काय ? उत्तरं द्या. हा जो अपघात का काय झाला तो, किती वाजतां ?"

"साडेचारला." गर्दीनं घोषणा केली.

"वरोवर. वार कोणता आज ?" अण्णाचा दुसरा प्रश्न. अगदींच पोरकट.

"शनिवार."

"म्हणजे कंपनीच्या खाणीं आज अडीचला बंद व्हायला हव्यांत. कारण कामगारांना पगार होतो आज. ते हापिसांत जमतात. काय गोष्ट खरी आहे कीं नाहीं ? मग आतां सांगा दरड कोसळून तिच्याखालीं किती माणसं दगावलीं असतील ?" टेवलावर मूठ आपटून म्हाताऱ्यानं जोरांत विचारलं. मास्तरच तो. पोरांना शिकवायची संवय. तर आतां लोकांना शिकवीत होता.

"आं—आं—" लोकं गोंधळलीं, विचारांत पडलीं.

"अरे आं आं काय ? मेंढरं काय रे तुम्ही ? वोला—"

"खाणी वंद तर माणसं नसणारच तिकडे. आणि मग मरणार कोण रे ? अण्णा ?"तूं ? का मी ?" खांवाला टेकून वसलेल्या, एका म्हाताऱ्या इसमानं विचारलं.

"तूं नाहीं. मी पण नाहीं. राघल्या कृष्णा !" अण्णागुरुजीनं हंसतच जाव दिला. "अरे पण काय हा राक्षसी प्रकार ? आं ! पंचायतीच्या एका फडतूस निवडणुकीसाठीं शेंकडों माणसं नाहक वळी देणार तुम्ही ? माझ्या महामायेच्या कृपेनं निभावलं. वार चुकला, टायम हुकला. त्या हलकटाचा डाव फुकट गेला. आत मरणार आहे तोच. उद्यां—निवडणुकींत मला मत म्हणजे या महामायेच्या सोन्याच्या कळसाला मत. विसरूं नका—विसरूं नका...'

अण्णागुरुजीला पुढं वोलवेना. त्याच्या तोंडून शब्दच फुटेना. मध्येच आवाज वसला त्याचा.

म्हातारा फार थकला होता.

—क्रमशः

हींच तीं व्यंगचित्रात्मक•




अनुवादक : दि. श्री. कराडकर

आस्ट्रेलियाचे सुप्रसिद्ध चित्रकार श्री. जॉर्ज मोलनार यांची जुलै अंकापासून सुरुं झालेली व रसिक वाचकांना आवडत असलेली......

**मिलान :**

स. न. वि. वि.

मिलान प्रगतिशील आहे. मिलान श्रीमंत आहे. तिथले कारखाने व उत्पादनाची साधने ही जगांतील इतर कुठल्याहि देशाहून सुधारलेली आहेत. इथली आजची वास्तुकला ही उद्यांच्या जगाची आदर्श वास्तुकला ठरणार आहे. उत्साह, जोश आणि कुशलता ह्यांचं हे शहर आहे.

थोडक्यांत इटालीतील गलीच्छपणा म्हणजे मिलान.

नाक्यानाक्यावर पोलिस दिसतात पण नागरिक नाही. रस्त्या-रस्त्यांतून गर्दी दिसते ती 'टुरीस्ट' लोकांची. मिलानी घरकोंबडे, जगाच्या पुढे जाण्यासाठीं वेडे बनलेलें, असे आहेत. जर्मन व डच हे प्रमुख 'टूरीस्ट'.

सध्या मिलानमध्यें कॉंक्रीटच्या तीन बहुमजली (sky-scrapers) इमारती एकाचवेळी बांधल्या जात आहेत. एका इमारतीचा आकार जहाजासारखा आहे व ती अधांतरी उभी आहे. दुसरी खाली निमुळती होत गेली आहे. बुडापेक्षा तिचा वरचा भाग चाळीस फुटानें रुंद आहे. तिसरी इमारत म्हणजे मिलानमधील एक धाडसी योजना ठरावी. ती पूर्णतः योजनाविरहीत आहे.




त्रिएनलच्या उद्घाटन समारंभाला मी गेलो होतो. चित्रकला व वास्तुकला ह्यांचं हे त्रैवार्षिक जागतिक प्रदर्शन आहे. कलाकृति आश्चर्यजनक, सुंदर आहेत.

अवकाश व प्रकाश उत्तम सांधलेलें आहेत. विराम आणि प्रसरणहि तितक्याच कुशलतेनें पावलेलें आहेत. ह्या प्रदर्शनांतून फिरल्यावर सचैल 'टर्कीश' स्नान केल्यासारखं वाटलं. मला आनंद जाहला. आपण कुणी तरी भला माणूस आहोत हे पटलं.

कलावंत ? मला फार वाईट वाटतंय. त्यांचं प्रदर्शन भरविण्यांत आलं नव्हतं.

**रोम :**

स. न. वि. वि.

इमारतींचें रंग ठराविक. बदामी, पिवळा, लाल. सूर्यप्रकाशाच्या झोतामुळें इमारती सोन्यानें न्हाऊन निघत आहेत असं वाटतं. तुम्हीं जेव्हां हॉटेलचं जाडजुड बिल देता तेव्हां हे आवर्जून पटावं. सोनेरी इमारतींतील किमतीहि सोनेरी.

ह्याचा अर्थ इटाली महागडं आहे असा नाहीं हं. पुष्कळशा वस्तु 'लई सस्त्या' मिळतात.

इथल्या भव्य इमारतींप्रमाणें इथली माणसंहि भव्य. संकट समयीं ती फार चांगली वागतात.

रोम हे सनातनी शहर आहे. सार्वजनिक सूचना दगडांवर कोरलेल्या आढळतात. जितका दगड घट्ट, तितक्या ह्या सूचनाहि घट्ट. एका लहानशा गल्लीच्या टोकावरील एका दगडावर अशीच एक सूचना कोरली आहे.—रहदारीचा रस्ता नाहीं. गुन्हेगाराला २५ 'स्कुडीस' दंड — सूचना १७६१ सालांतील आहे. पण अंमलबजावणी आजतागायत चालू आहे. लोकांना ही एक डोकेदुखीच होऊन बसली आहे.

इथें गोंगाट विलक्षण असतो. अरुंद रस्त्यावरून आरडत ओरडत स्कूटर्स पळत असतात. मोटारी व सायकली ह्या आक्रोशांत सहभागी होत असतात.

प्रवासी कुठें नाहींत ? येथेंहि आहेत. रोमचं सौंदर्य पहात हिंडत असतात.

रोमन माणसाला ह्या प्रवाश्यांचं सोयरसुतक नाही. तो प्रत्येकाचं आनंदानें स्वागत करतो.

अनुक्रमणिका






**केन्स :**

●

स. न. वि. वि.

तुकतुकीत होड्या, तुकतुकीत मोटारी, तुकतुकीत बायका. सुंदर बायका, संतान परीधान केलेल्या, सुहास्या.

पोषाखांत फारच काटकसर करण्यांत आली आहे. असं मला निष्पापतेनें वाटलं. फसलो. नवी फॅशन आहे ती. छाती कशीवशी झांकण्याची व आंखड चड्डी घालण्याची.

निळ्या बंदरावरील सफेद होड्या — हॉलीवुड फ़िल्मचं वेड दाखविणारं प्रतिक जणूं. होड्या येतात आणि जातात. नाईस, मेन्टन, कॉर्सिका, ग्रीस ह्या ठिकाणी त्या जातात. होडींत बसलेल्या सुंदरीने आपलं शरीर झोकलेलं असतं. डोळे मिटलेले. हातांतील फॅशन-मासिक बघण्यासाठीं डोळ्यांची क्वचित उघडझाप. पेय पिण्यासाठीं तोंडाचा मधूनच 'आ'. एकामागून एक दृश्य सरकत असतात. होडीतच वास्तव्य करणारे निवासी किनाऱ्यावर चुकून फिरकत नाहींत. होडी रिकामी दिसली तर प्रवासी आपली होडी बळकावतील, ही वावळट भीति.

रीव्हीएराला दर्दी लोक जमतात. खान, महाराजे, सिनेनट — एकाहून एक दर्दी.

अंधार पडत चाललाय. आज रात्रीं ली कॉनकोर्स डी' एलिगन्स डी' ऑटोमोबाईल (ही काय भानगड आहे?) आहे. चंद्रप्रकाश मस्त पडलाय. पण त्याला कसला तरी वास येतोय. बहुतेक चंद्रानें डोक्याला (Sun Hair Oil) लावलं असावं.




**फिजि :**

●

स. न. वि. वि.

फिजि एक रानटी प्रदेश आहे. खाणं राक्षसी, वागणं राक्षसी, राहणं राक्षसी. सगळा प्रदेश ह्यामुळें ओंगळ वाटतो.

एबेल टासमनने हा देश शोधून काढला.

गेल्या युद्धापर्यंत फिजि म्हणजे टोकाचा प्रदेश, असं मानण्यांत येई. पण आतां प्रवासाचा मधला टप्पा म्हणून विमानं फिजिला उतरतात. जग किती पसरलं पहा.

ह्या बेटाबद्दल चुकीची कल्पना करून दोन हॉलीवुड दिग्दर्शकांनीं चुकून ह्या बेटाला भेट दिली. पस्तावलेल्या मनःस्थितीतच चित्रपटांसाठीं 'शॉटस्' घेतलें. पण ह्या घटनेमुळें प्रदेश मात्र कीर्तिवंत झाला.

रेडइंडीयन, आदिवासी व प्रवासी ह्यांचीच प्रामुख्याने ह्या प्रदेशांत वस्ती आहे.

रेडइंडीयन आपसांत एकमेकाला आलटून पालटून टॅक्सीत फिरवून उपजिविका करतात.

आदिवासी मात्र हल्ली कामधंदा करतात. पूर्वी ते एकमेकांना खात असत.

पुरुष लुंग्या नेसतात तर स्त्रिया तरटाची वस्त्रं परीधानतात. पुरुष व स्त्री– दोघेहि अक्राळविक्राळपणें केंस वाढवितात. त्यामुळें लांबून पुरुष कीं स्त्री, हे ओळखणं कठीण जातं.

प्रवासी ?

ते इथें पैसे उधळतात. स्वतःच्या षोकांसाठीं. लॅटिन प्रवाशांना उत्तम जेवण व उंची पेय हवं असतं. ब्रिटिशांना "Early Morning Tea' चं वेड असतं. ह्या तीन शब्दांत त्यांचा जिवितानंद सांठविलेला असतो. अमेरिकनांना उलट–सुलट सुलट–उलट, वर-खाली, खालींवर प्रदेश पहावयाचा असतो.

इकडील हॉटेलें म्हणजे आपल्याकडील टावरानं शोभावीत ! कुठेहि, केव्हांहि जा मच्छरं तुमची वाट पहात असतात जणूं आदिवाशांसारखीच रानटी ! **(क्रमशः)**

## 'हांक'



उत्तरसीमा पेटुनी उठली द्याया आहुति चला क्षणीं ।
तटस्थ राहुनि जिनगानीवर थुंकुनि घेईल काय कुणी ।।१।।

दण्डमंत्र हा उपाय एकच चिरडूं आसुरा मुळांतुनी –
राष्ट्रनाश हा कराल सारा, जरी घडीला स्वस्थ तुम्ही ।।२।।

जीवन जगण्या तसें जगविण्या राष्ट्राला जे रक्त हवे ।
रणांगणी ते देऊनि घालू, राष्ट्रजीवनी रक्त नवें ।।३।।

निर्माल्या परि जीवन जगणे, परवडेल ना आम्हा तरी ।
सर्वस्वाचा होम रणीं जरि, कोण तयाची फिकिर करी ।।४।।

रणमर्दाची निघे सवारी जशी भरारी गरुडाची ।
फिका एडका धडक अशी मग, रणांगणी बघ वीरांची ।।५।।

महाराष्ट्राचा शूर शिपाई कधी न डरला अशा क्षणीं ।
खुल्या बाहुवरि वार झेलिता, पडे इथे हा रणांगणीं ।।६।।

पैजेचा हा विडा उचलुनी, येत जरी हा कुणी महा ।
पडेल मुडदा इथे तयाचा, इतिहासाची साक्ष पहा ।।७।।

भारतभूची परंपरा ही, कीर्त गाजली दिगंतरी ।
विजयश्रीनें तिलक भाळिचा, रिपुरुधिरानें अमर करी ।।८।।

राष्ट्राची ही हांक ऐकुनी, रक्त, सुवर्णा दान करूं ।
'भारत भू' जयघोष करोनी, हिमालयाची वाट धरूं ।।९।।

जिव्हा, धमनी एक जरी हो, पंचेचाळिस कोटींची ।
सांग ! कुणाची होइल हिम्मत, मनगट जोखुनि बघण्याची ।।१०।।

भेदभाव हे विसरुनि सगळे, मनगट, बळकट करा क्षणीं ।
उत्तर सीमा पेटूनि उठली, द्याया आहुति चला क्षणीं ।।११।।

—पण्डित महाजन



अनुक्रमणिका




तीळ संक्रांत भारतीय संस्कृतीचे लेणें आहे. सवाष्ण यावेळीं महावस्त्र नेसून सौभाग्याचा मान राखते. सौभाग्य चिन्हाची प्रचिति घडविणारी हींच ती ववसा पूजा....

—डॉ. सरोजिनी बाबर, पी. एच. डी.

**आमच्या** मराठी मुलखांतील खेडयापाडयांतून सणासुदीच्या वेळीं पूर्वापार चालत आलेल्या अनेक चालीरीतींचा मानपान राखला जातो. आपल्या घराण्याचें तें सौभाग्य चिन्ह म्हणून समजलें जातें. विशेषतः स्त्रीजीवनांत अशा गोष्टी आवर्जून करण्याची प्रथा आहे. या संदर्भात 'संक्राती'चा विचार येथें प्रस्तुत आहे.

संक्रांतीचा सण आमच्याकडे मोठा आनंदाचा म्हणून साजरा करण्यांत येतो. या वेळीं ज्या प्रमाणे शेतांत आलेल्या नव्या तीळ-गुळांची देवाणघेवाण होते व स्नेहभाव राखण्याचा प्रयत्न होतो. त्याचप्रमाणे 'ववसा' पूजा करून सौभाग्याचाहि मान ठेवला जातो.

आपल्या घरच्या मुलीचे लग्न झाल्यारनंतर पहिल्या वर्षी ही पूजा विशेष थाटामाटाने केली जाते. त्यासाठीं त्या मुलीच्या सासरची मंडळी मुद्दाम 'ववसा' घेऊन येतात. हा 'ववसा' खण नारळ, पातळ–साडी, डाळ, गहूं, तांदूळ, तीळ, पानसुपारी, हळदकुंकू, गूळ खोबरे इत्यादिनी नटलेला असतो. घरच्या हौसे-मौजेच्या रीतीप्रमाणें वाजत गाजतहि हा 'ववसा' येतो किंवा परगांवी न्यायचा असेल तर तो वेगवेगळया पदार्थांनी भरलेली ताटे भरून नेण्यांत येतो.

अलिकडे या सामानाचें जोडीला हलव्याचे निरनिराळें दागिनेहि मुलीसाठीं तयार करून नेण्याची चाल पडत चालली आहे.

या वेळीं प्रत्येक घरांत पूजा होते त्याप्रमाणें या मुलीच्या घरीहि माहेरी—पूजा होते. त्यासाठीं पांच सुगडे, पांच वुडुकुली व पणती कुंभाराकडून ताजी वनवून आणावी लागतात. त्या सर्वांना मंगल स्नान घालून चुन्याच्या रंगाने त्यावर नक्षी काढतात. आणि मग त्यांना हळदकुंकू वाहून त्या प्रत्येकांत तीळगूळ पावटा, गांजर, हरभरा, ऊस, मुईमूग, गव्हाची लोंबी, बिव्या, हलवा इत्यादि पदार्थ थोडे थोडे घालतात. नंतर त्यांची एखाद्या पाटावर महावस्त्र घालून स्थापना करतात. या पाटापुढे रांगोळीची व समयांची आरास केली जाते. आणि मग पुरण पोळीचा नैवेद्य अर्पण करून सवाष्णी बायका या 'ववशा'ची पूजा करतात. अशा वेळी प्रत्येक जण एकमेकीस ववसते. म्हणजे प्रत्येकीला अखंड सौभाग्य चिंतिते. आणि त्यासाठीं हळदकुंकू लावून, तीळगूळ देऊन यापैकी एक सुगड भेटी दाखल देते. ह्यावेळीं हें सुगड पदराने धरून सवाष्णीच्या गुडघ्यांवर, खांद्यांवर व डोईवर टेकवीत पांच वेळा खालीवर केले जाते व नंतर ओटीमध्यें देण्यांत येते. हा सर्व विधि चालू असतांना प्रत्येक सवाष्ण—"आला आला ववसा सीताचा सौभाग्यानं जन्मोजन्मीचा."

या रीतीची मापा करते. त्यामुळें ही पूजा व हा मानपान फारच वहारीचा होतो. दोन्ही घरच्या लोकांची हौसमौज अशा वेळी उफाळून वर येते आणि साऱ्या समाधानाचा उपसा होत रहातो. तशांतच जर एक दोघींनी जर का—

कळ नारंदाची खुटी। गमन तीन तळाच्या तळवटीं। राजांतरी पडल्या तटी। कस्तुरींत पडली हिंगाची चिठी। सोन्याची बिगाडली भटी। वडील गंधारी कुंती धाकटी। श्रीपान हात्तीच्या शिरीं। कळ निर्मान झाली खरी। आतां ववसून गेली गांधारी ॥१॥

आज ववसा अस्तानापुरं। तियं काय नांदं कैवर (कौरव) चातुर। याक आगळा बंधु शंभर। शंभरांची दुष्ट नदार। त्यांनीं बसुन केला विचार। त्यांनीं काय नाई पाहिलं दुरी। कळ निर्मान झाली खरी। आतां कववसुन गेली गांधारी ॥२॥

आंबारीच खांब सोनेरी। सोन्याचा कळस चमकतो वरी। हात्ती सजविला भवतापरी (बहुत परीने)। गळचां काय घाट सर दुहेरी। कळ निर्मान झाली खरी। आतां ववसून गेली गांधारी ॥३॥

आंबारींत बसुन ह्या मातला। फैक वडतो हात्तीला। हात्ती काय दोर सुद चालला। वान दिलं नगर नारीला। नगरीं ववसुनी हात्ती फिरविला। शस्तर धरलंय कुंतीवरी। कळ निर्मान झाली खरी। आतां ववसून गेली गांधारी ॥४॥

अर्जुन म्हनी भिऊ बळी। चिखलाची गोष्ट नाई बरी। धाडुनी पत्र इंद्राघरीं। ह्या इंद्रावं जानं बाहेरी। पोंचले बाण इंद्र कचेरीं। त्यांनीं पाहिलीं वाचुनी। हात्ती धाडुनी द्या लौकरी। कळ निर्मान झाली खरी। आतां ववसून गेली गांधारी ॥५॥

अर्जुन मंत्रासी जपला। भिऊ बाणाचा निसटला। कुंतीनं वरच्या वर झेलिला। भिऊ म्हनी लज्जा न्हाई अंतरीं। घ्या उस्नं आपलं लौकरी। कळ निर्मान झाली खरी। आतां ववसूनि गेली गांधारी ॥६॥

आज ववसा घ्या तिळगूळ। ह्या ववशापुन मातली कळ। तूं झुराळ मी सागर। तियं काय दत्तात्रीचं देऊळ। किष्णदेव आमचे कैवारी। आता ववसून गेली गांधारी ॥७॥

'ववशा'चे हे खास जुन्या काळचे गाणे विनचुकता म्हटले तर मग ही पूजा गांवभर वाखाणली जाते. आणि त्या नादात संक्रांतीचा सण आणि ही ववशाची पूजा थाटामाटाने प्रत्येकाला ववसीत पार पडते. अशावेळीं वातावरण फार खेळीमेळीचें असतें व प्रत्येक सवाष्ण मंगल स्नान करून महावस्त्रे नेसलेली व अलंकार परिधान केलेली अशी दिसून येते. त्यामुळें ह्या वेळचे दृश्य प्रेक्षणीय व उल्लेखनीय असे असतें.

• • •

अनुक्रमणिका



विठावाईला मांडीवर घेऊन त्यानं कपाळावर अज्जाद ठेवलेला रुपाया तिला जिभेनं उचलायला लावला होता. 'आतां आनि यकदांच . . .' म्हणून सातवी खेप त्यानं भरली होती, तेव्हां गोपाळा जावव ओरडला होता,

" मदनशेट, फुरं करा ह्यो चावनाटपना. कोंवडं वरडलं. घरच्या भाकरीलावी वाईच ठेवा की कालवान . . . "

तांवड्या लाल डोळ्यांनी मंडळी उठली. कुणी परमारी रानांत गेली. कुणी घरला गेलीं. मदनशेट लावणीचं चरण गुणगुणतच गादीवर पडला होता.

गडद झोपेंतसुद्धां ज्याच्या मांडीवर विठावाई वसत होती त्यानं कां वरं लवकर उठावं !

आदळआपट करीत मदनशेटची वायको सकाळचीं कामें करीत होती. लोट झाड, पाणी भरणं ती रागांतच करीत होती. तिला तरी कां राग येऊं नये ! आज चार रात्रीं झाल्या मदनशेट वाहेर होता. पहांटेपर्यंत खुशाल मागची काळजी न करतां तो वाहेर रंगला होता. वरं, लग्न होऊन तरी काय पांच–सहा वर्षं झाली होती ? मग होतं वरोवर त्याचं. येतो माणसाला कंटाळा. जीव विसरायला राहतो माणूस कुंठतरी वाहेर. पण तसं कुठंलं आलंय् ! मदनशेटचं लग्न होऊन नुकती दोन वर्षं झालीं होती.

# अभिसारिका

—पद्माकर गोवईकर

**सकाळ** झाली. उन्हं चांगली निवर झालीं. शेतामळ्यावर लोक निघून गेलें. गुरंढोरं रानांत गेलीं. गांव शांत ओकेंवोकें दिसूं लागलें. क्वचित पाराकडनं सांवलींत गोटयांनी खेळणाऱ्या पोरांचा दंगा ऐकूं येत होता. वाकी चिडीचिप होतें.

अशा शांत वेळीं मदनशेटनें कुशी वदलली. तळ्यांतल्या रेड्यानं संथपणें इकडचं अंग तिकडे करावें, तसें त्यानें गादींतल्या गादींत अंग घुसळलें. आणि त्यानें तसे केलें. तशी नेहरू शर्टाच्या खिशांतील नाण्यांनी खळखळ आवाज करून गादीवर अंग टाकलें. पैसेहि रात्रमर व्यवहार करून थकले होते.. न्हावडांतल्या वस्तीवरल्या वाड्यांत इठा सातारकरणीचं नाचगाणं रात्रभर झालें होतें. 'आणखी एक, आनि एकच . . .' करीत मदन शेट तिच्या मुठी नाण्यानें भरत एक एक लावणी सांगत होता. तिच्या नाचरंगानं 'सारी सारी रात' रंगून गेली होती. मंडळी रंगून गेली होती. मदनशेट तर फार खुळ्यागतच करायला लागला होता. कमी नाही जास्त नाही ओळीनं सहा वेळा

नुकती कुठं मजा यायचे दिवस, आणि त्यांत हा असा वाहेर राहत होता. दुसऱ्याला काय मन हाय कां न्हाई. किती वाट वघायची मानसानं. पोरवाळ एक न हूंदे, पन चार गोष्टी जवळ घेऊन वोलायला काय पैसं पडत्यांत ! पण पैसे घेऊनच 'चार

गोष्टी ' करायला बाई जवळ घ्यायची मदनशेटची संवय असल्यामुळें आपल्याशीं तो फुकट बोलत नसावा, एवढं कांहीं तिच्या ध्यानांत आलं आहीं.

तिनें झोपलेल्या मदनशेटकडं रागानं पाहिलं आणि कमरेवरची वीस शेराची घागर दणकन् कोपऱ्यांतल्या कट्टयावर आदळली. हुश् करून ती जरा खाली टेकली. जोडव्याचं पाय लांब करून भिंतीला पाठ लावून बसली. पदरानें कपाळावरचा घाम तिनं पुसला. आणि एकाएकी ती नवऱ्यावर ओरडली,

" उटणं हुतंय कां आतां ? तुमी तरी कश्याला उटाल. बाई नाचत असंल अजून डोळ्या म्होरं—"

आणि खरोखरीच मदनशेटच्या मिटलेल्या पापण्याआड अजून बाई नाचत होती. आतां तो तिच्या मांडीवर बसला होता. आणि आपल्या कपाळावरचा रुपया तिच्या कपाळावर टेकवत होता. त्याची झोप जास्तच गडद झाली होती.

तारा चिडली. पदर कमरेला खोचत ती उठली. तुकतुकीत घासलेल्या तपेल्यांतलें पाणी तिनें ओंजळींत घेतलें. आणि दांतओठ खात मदनशेटच्या चेहऱ्यावर सपकन् पाणी मारलं.

" अग, अग, शालू माजा निरींत लाल झाला . . . वढूं नको . . . रडूं नको . . ." करीत घाबऱ्याघाबऱ्या मदन जागा झाला.

"मढं बशीवलं तुमचं . . . उटा . . ." म्हणून तारानें अंगावरची वाकळ खसकन् ओढली.

" अग . . . अग. पन् . . . "

" अग, अग न्हवं, उटा आतां. पुन्हा रात पडायची. येळ झालीया . . . "

पावसाळयांत गुळाच्या ढेपेला पाणी सुटावं तसा मदनशेटचा चेहरा दिसूं लागला. त्याने डोळं पुसून तिच्याकडें पाहिलं आणि तो म्हणाला, " ये की वाईचं हिकडं . . . "

" मीऽऽ हाय. वाई न्हवं तमाशांतली मी . . . "

" वाकी रातची वाई ह्याक हुती हां ऽऽ! डोळं चोळत मदनशेट म्हणालं.

" जायाचं की न्हाई तिच्या संगट " तारा चिडून बोलली,

*मदनशेटच्या मिटलेल्या पापण्याआड अजून बाई नाचत होती. आता तो तिच्या मांडीवर बसला होता. कपाळावरचा रुपया तिच्या कपाळावर टेकवत होता ....... तशी त्याची बायको दांत ओंठ खात उठली आणि ...............*

" जानार हुतो, पन तुझी आठवन झाली न् मागं फिरलो वग. "

" आरं हाड् ये, कुत्रं आयकल विकल . . . लई उपकार केलंसा, उटा आतां– "

" असं का गं म्हनतीयास ? "

" न्हाई तर काय ? तुम्हाला वायकोच नगो झालीया— "

" असं कवा म्हटलं हुतं मी ? "

" म्हनायला कशाला पायजेल ! त्ये दिसतंयच की ! "

" काय दिसलं तुला ? "

" आनि काय दिसायचं ! तुम्हाला वायकूच्या जिवापरीस तमाशांतली वाई प्यार हाय . . . "

" तुला काय कमी पडूं दिलं का ? "

" काय केलंसा ? अंगावरली कापडं आनि पोटाचं खळगं रांडावी भरत्यात . . ."

तारा कांहीच्यावाहीच वोलूं लागली. फार दिवसाचा राग बाहेर पडत होता. मदनशेट नाराज झाला. उठल्या उठल्या ही आरती ओवाळायला वसलेली बघून त्यानं ठरवलं कीं, गुमान ओवाळून घ्यायची. तो गप वसला. तो गप बसलेला वघून ताराला जोरच चढला. त्याची चुकी म्हणून गप बसलं असं तिला वाटलं. हातवारे करीत ती म्हणाली,

" कां बोलवंना व्हय आतां '? उचकटा की तोंड ! "

" काय बोलायचं ? कायवी भकतीयास. काय राम हाय कां बोलन्यांत — ! "

" तुमी रातची शितामाई हुडका. मी राम हुडकत्यें आतां "

" काय म्हन्न काय तुझं ?" मदनशेटनं चिडून विचारलं.

" माजं काऽऽय म्हन्नं न्हाई. उटा, च्या प्या, गांवामाईर वाई नाचतीया आनि तकडं जा . . . "

" काय चव हाय ह्या वोलन्यांत . . . ! "

" चव घरची माकरी खानारानं सांगावी. इकल्यांदा म्हनालं रेडिवो आना, रेडिवो आना. आनलांत कां ? "

हा सगळा राग रेडिओपायीं होता. मदनशेटला आतां सारा उलगडा झाला. फार दिवसापासून घरांत रेडिओ आणा असं त्याची बायको म्हणत होती. पण तो तिकडं दुर्लक्ष करीत होता. नाना उचापती करणाऱ्या मदनशेटला रेडिओ घेणें फारसें अवघड नव्हतं. गांवच्या सोसायटीला त्यानें एक नवी ट्रक सरकारांतून मिळवून दिली होती, गांवात शाळा काढली होती. आतां एक संस्कार केंद्रहि सुरू होणार होतं. हें सगळं गांवाला मदनशेटच्या वजनानें मिळवून दिलं होतं. या वाहत्या ज्ञानगंगेत काय पांच-सातशेचा रेडिओ सुटत नव्हता ! पण मदन-शेट त्यांतला नव्हता आणि खायचं तें असं वाजंची लावून, रेडिओ लावून कशाला खायाचं ? एका रेडिओची किंमत तो एक रात्रींत गुलाबाईवर किंवा मोगरीबाईवर उधळून लावत होता. रेडिओचा नाद त्याला मुळांतच नव्हता. खरं तर कसलाच नाद त्याला नव्हता. पांचसहा घरं असावींत, वक्कळ जमीनजुमला असावा आणि त्याच्या तालावर दिवस रात्र तीन–चार बाया साऱ्या नाचत ठेवाव्यांत, एवढी इच्छा सोडली तर मदनशेटला कसलीहि व्यसनें नव्हती. त्याच्या बायकोचा मात्र सारखा भुंगा चालू होता, " रेडियो आना.–रेडिवो आना. यवढं गावाचं फुडारी म्हनता आनू घरांत रेडिवो–न्हाई . . . "

मदनशेट संयमी माणसाच्या आवाजांत•



अनुक्रमणिका








" व्हय आनूं आनूं " असं म्हणून तिची समजूत काढत होता. पण आज ती चांगलीच रागाला आली होती. तिनं रेडिओचं नांव काढल्यावरोवर मदनशेटला तिडिकच भरली प्रथम तिचा आणि नंतर त्याचा संयम सुटला. तावातावानें अंथरुणावरून उठत तो म्हणाला,

" आनि येगळा रेडियो कशाला पायजेला घरांत ? "

" न्हाई म्हना की सरला ! "

" आखरी डाव सांगतो रेडिवोविडिवो काय न्हाई . . . "

बायकोनं आदळआपट करीत कामाला पुन्हां सुरुवात केली. मदनशेट उठला. त्यानं मोरींत तोंड खंगाळलं. बुटावर धोतराचा लडिवाळ सोगा सोडून आणि कपाळावर कोंबड्यागत पांढऱ्या टोपीचा तुरा ठेऊन चहा न घेतांच तो घरावाहेर पडला.

" राम राम, मदनशेट . . . "

हात उचलून मदनशेटनें प्रति नमस्कार केला, पण त्याला नमस्कार कुणी घातला हें कळलंच नाही. त्याच्या डोक्यांत जत्रेंतला मोठा पाळणा फिरत होता, कनाती ठोकलेल्या दिसत होत्या, माणसांनी फुललेले आखाडे दिसत होतो. माणसांचा, शिट्यांचा गोंधळ ऐकूं येत होता. चित्त कांहीं ठिकाणावर नव्हतं.

पांच पावलं पुढं गेल्यावर तो टर्र्रकन् वळला. मागे वळून ओरडला,

" कोन त्यो, येश्या काय ? "

" व्हय् जी . . . " यशवंता पळतच त्याच्या दिशेनें आला.

" कुनीकडं पनवती चाललीया. ? "

" चाललो हुतो सरकाराकडंच "

येशा फिर्र्र करुन हंसला.

" काय काम हुतं ? "

" एक आडशिरीभर जुंधळं लागत हुतं."

" जा घरला— "

" जी . . . जी . . . "

येशा खुलला. मदनशेट वळला. हातांत धोतराचा सोगा धरून चालूं राहिला. पुन्हां एकाएकीं वळून त्यानें यशवंताला हळी दिली.

" येश्या ऽ ऽ . . . "

" जी ऽ सरका ऽऽ र "

" गोपाळा जाधवाला आन् बागलाला घेऊन चावडी म्होरं–ये . . . "

" बागल कोंता जी ? "

" त्यो चकणा बागल . . . "

" त्ये टरकं व्हय. त्ये असंल लाल झेंडे घेऊन हिंडत "

" अर्ध्या घंटयांत ये. लई पागूळ लावूं नगस . . . "

" व्हय्. व्हय् . . . "

आपल्या बुटांचा कारंकुर आवाज करीत मदनशेट चावडीपुढं आला. आला तशी कोतवाल तटातट उठले. अवं उठनारच की. कां हलका गडी हाय व्हव त्यो. तालुका परिषदेचा अधेक्ष्य त्यो. कोतवाल उठणार पाटील उठणार. सगळं गांव उठणार.

चावडी पुढच्या उन्हांत पांढरा झेंडा रोवल्यागत मदनशेट उभा राहिला. मानेनेच ' राम राम ' घेत देत त्यानं खिशांतून पिवळा हत्ती–( हत्ती खरं तर काळाच असतुया–) काढला. पाकीटांतून गांधी टोपीच्या रंगाची सिगरेट त्यानं बाहेर काढली नाही तोंवर आंतून पाटील माचीस घेऊन धांवत आले.



वरं का वंड्या, वॅटस्मन आऊट झाला नाही, म्हणने आम्ही हे असंच करतो !

मदनशेटच्या ओठांतल्या पांढऱ्या कांडीला काडी लावत पाटील अजी जीनं म्हणाला, " राम राममदनशेट असं भाईर कां ? आंत गादीव्, चला की . . . "

" गाद्याव् बसून राज्य चालवाय दिवस गेले पाटील आतां. ज ऽ ऽ रा गादीव् टेकलात कीं राज्य गेलंच समजा. तुमीबी लई-गादीव् वसूं नगासां . . ." धुराचा लोट पाटलाच्या तोंडावर सोडत मदनशेट म्हणालं.

पाटील आणि कोतवाल सक्तीनें हंसले. हंसून हंसून ओठ दुखल्यावर पाटलांनी विचारलं,

" आज रामपारीच चावडीकडं?"

" काम हुतं वाईच . . . "

" चला की आंतल्या अंगाला . ."

" नको. भाईरच ठीक हाय . . ."

" काय हुकुम हाय ?" पाटीलानं शेणागत जमिनीला चिकटत विचारलं. मदनशेटचा आवाज घोगरा झाला,

" बाबू पाटलानं काल तिसरा

खून केलाय् . . . "

" व्हय् . . . त्यो सात खून करनार हाय म्हनं . . . "

" त्याच्या मागावर पोलीस हायत . .

" व्हय् . . . "

" व्हय् न्हवं, गांवांत वस्तीला येनार हाय त्यो आज रात्च्याला. "

पाटलाचा काष्टा फिटायची वेळ आली. छातींत धाड् धाड् वाजाय् लागलं. गडबडीनं त्ये म्हनालं,

" तालुक्याला जाऊन पोलीस पार्टी आनायला जातो . . . "

" शानं हाय्सा " मदनशेट बुटाखाली पिवळा हत्ती चिरडत म्हणाला,–"बाबू पाटील सरकारला धावता कामा न्हाई. थोरल्या साहेबांचा हुकूम हाय तसा. गांवचा मानूस हाय त्यो आपल्या . . . "

चुलींत माजून काढलेल्या पापडागत पाटलाचा चेहरा झाला. त्याला बोलायचं सुधारेना. वळलेल्या ओठांनी तो मदनशेटकडे डोळे गेलेल्या माणसासारखा बघत राहिला.

मदनशेट दुसरा पिवळा हत्ती तोंडात धरून उभा होता. . . .

तेवढयांत गोपाळा जाधव, टरका बागल. येशा, वाण्याचा एकनाथ हीं चार–पांच मंडळी चावडी पुढं गोळा झाली.

" राम राम मदनशेट . . . "

" राम राम—" मदन म्हणाला,

पाटील, जावा तुम्ही, लागा कामाला . . .

शिक्षागत जड झालेले पाटील आंत गेले.

" काय काम काढलं हुतं ? " जाधवानं विचारलं.

" काम ? " खॅस मारून मदनशेट ओरडला, " लाजा हायेत कां मडव्यानो तुमास्नी ? "

मदनशेटचा हा अवतार बघून चौघेहि गडबडले. कुणाला कांहीं कळेना. वरेच दिवसांत चुकी न करणें ही सुद्धां आपली चुकी असावी असं वाटून, धीर करून येश्यानं विचारलं.

" काय चुकी झाली काय सरकार ? "

" चुकी ? मोटच्या नाड्यानं बांधून ठेवाय पायजेल लेकानूं तुमास्नी . . . सरम रं कशी वाटत न्हाई ? "

यावर शरम वाटल्यासारखं करून वाण्याच्या एकनाथानं तोंड उचकटलं, " चुकी सांगावी आमास्नी . . . "

वळू सोडल्यागत मडव्यानो गांवभर चरत हिंडताय् ! गांवाची जत्रा पंध्रा दिसावर आली. पट्टी कुनी तुमच्या बानं गोळा करायची व्हय ? "

चौघांना चुकी कळली. गांवाची जत्रा येत्या पौर्णिमेला आली होती. बारा चौदा दिवसांत सगळी तयारी व्हायला हवी होती. दर वर्षी हे काम मदनशेटची मंडळीच करीत आली होती. महिनाभर आधीं वर्गणी मागण्यापासून जत्रेतली पालं उठून जाईपर्यंत ते त्यावर देखरेख ठेवत असत. आणि या वर्षी जत्रा पंधरा दिवसावर आली तरी पट्टी मागायला कुणी फिरकत नव्हतं. मदनशेटनं मनावर नाही घेतलं तर जत्रा होणार नव्हती. तो रागाला आला होता. हाताखालच्या माणसांचे लाड केव्हा करायचे आणि त्यांना धारेवर केव्हां धरायचं याचं कोष्टक मदनशेटला

बरोबर समजलं होतं. आत्ता तोंड भरून शिव्या दिल्या नाहीत तरं काम होणार नाही हें ओळखून तो त्यांना शिव्या देत होता.

चौघ जणं ढेपाळल्यागत उभे होते. कुणीच कांहीं बोलत नव्हतं. तसा मदन आणखीनच भडकला,

"मी काय आज जलमलो न्हाई. बघत नका बसूं माझ्याकडं. कामाला लागा . . ."

"उंद्यापास्नं लागतो . . ." टरका बागल वीस वर्षांतनं एकदांच बोलल्यागत बोलला.

"उंद्या काय तुझ्या बाचा दिवस हाय क्काय ? आज दोपारनं जुपी झाली पायजेल. आठ दिसांत हजार बाराशे गोळा झालं पायजेत. माझ्या नांवावर गोळा करा..."

तंबी देऊन मदनशेट जीपमधून तालुक्याला निघून गेला. हे चौघंहि कामाला लागले.

० ० ० ०

चार दिवस चौघं देमार हिंडले. पाय तुटेतों हिंडले. जीभ झडेतों बडबडले चार–आठ दिवसांत हजार बाराशे रुपये त्यांनी गोळा केले. आणि मदनशेटच्या घरीं जमा केले. गांवांतल्या जीवनदास गुजरानं मात्र त्यांना दाद दिली नाही. गुजर पैशाला भारी चिकट. चमडी देईल पण दमडी देणार नाही. फुकट असलं तर मटणांत शिजवलेली पालसुद्धां खांयचा. त्यानं पैसे देत नाही म्हणून सांगितलं. गोपाळा जाधव मदनशेटला सांगत आला,

" त्या बाकळ्या गुजराकडं बघाय् हवं . . . "

" काय म्हनतंय् त्ये ? " मदननं विचारलं.

" ह्या सालीं एक छदाम देणार न्हाई म्हनतंय् "

" बराय् " म्हणून मदनशेटनं कपाळावर टोपी चढवली,

" मी येतोय् म्हणून सांग जा. . . " असा त्यानं पुढं निरोप पाठवला.

शाळेच्या इमारतीपर्यंत जाईपर्यंतच तिकडून गुजर लडालडा पोट हलवत आला. ऊर धपापत तुपकट हंसत म्हणाला, " तुमी कशाला आले मदनशेट. आमी तुमच्या मकाणाकडेच येत होतो. आमी पैशाला नाई म्हणत नसते. हे घ्या." असं म्हणून त्यानं मदनशेटच्या हातावर शंभराच्या दोन नोटा ठेवल्या.

सगळींकडनं पैसा धांवत आला. नगद पंधराशे रुपये जमले. तमाशा कोणता बोलवायचा, पैलवान कोणते बोलवायचे याची चर्चा लोकांत सुरू झाली. मांडव कुठं घालायचा मिरवणूक कुठणं–कशी काढायची याची आंखणी झाली. जत्रेचं वातावरण दिसूं लागलं. पोराटोरांच्या तोंडातून हलगी– लेजमीचे आवाज येऊ लागले—

" टिंग टांग टिंग टांग टांग टिंगांग . . . "

तीन दिवसावर जत्रा आली तशी एक दिवस सांजच्यापारी गावांतली नामांकित मंडळी मदनशेटच्या ओसरीवर हजर झाली. चौगुल्या, नाम्या शिंपी, बाळा मोघम, भाऊ शिरोळचा आणि पांच दहा लोक गर्दी करून मैदानाकडे आले. तो नुकताच तालुक्यास्नं महत्वाची मिटिंग घेऊन आला होता. तालुक्यालाच जेवण झाल्यामुळें तो येऊन स्वस्थ पडला होता. लोकांची हळी ऐकल्यावर तोंडातल्या पिवळ्या हत्तीचा निळा धूर सोडत तो बाहेर आला. सगळ्यांनां असं गोळा होऊन आलेलं बघून त्याला वेगळीच शंका आली. त्यानं चौगुल्याला विचारलं



अनुक्रमणिका







अनुक्रमणिका









" कोन गेलं क्काय ? "

चौगुल्याला प्रश्न कळला नाही. मवाळ स्वरांत तो म्हणाला, " कोऽऽनी कुठं जात न्हाई बाबा ! समदी आलींत . . . "

" तसं न्हवं . . . "

" मंग कसं ? "

" कोण मेलंबिलं काय ? "

" सांजच्यापारी कां कुनाला घालीवताय ! "

चौगुल्या सगळयामध्यें वयानं मोठा असल्यामुळं मदनशी तो सलगीनं बोलू शकत होता.

" कोन गेलं न्हाई, मेलं न्हाई तर कां असं समदी जणं घोळा मेळानं आलाय् रं ? " मदनशेटनें विचारलं.

" ह्ये पायताण घे आन् उडव समद्यांच्या टकुऱ्यांत एकेक " जत्रा तीन दिवसावर येऊनहि मदनशेटला त्याची दखल नसावी याचा चौगुल्याला राग आला होता.

" काय झालं काय ? " मदननं विचारलं.

" पयलं ह्ये चार जोडं उडवा आमच्या टकुऱ्यांत ! "

" अरं मर्दा, असं वाकडयांत कां शिरतोस ? काय झालं ? "

" खुळया, जत्रा परवाच्याला येऊन ठेपली अन् झालं काय इचारतोस ? आज मांडवाची कुदळ पडाय् पायजेल. रुपये तीनशे दे. मंडपाचं सामान आनायचं हाय. . . "

मदनशेटनं पेटती सिगारेट उम्याउम्या खांबाला घासली. त्याच्या डोळयाची गोटी टरकली. रागानं तो चौगुल्याला म्हणाला,

" चला गांवाभाईर, फांस टांगा. एक चौगुल्याचा, दुसरा गांवच्या पाटलाचा आन् तिसरा माझा वडा मजी सुटली आमी . . . "

मदनशेटच्या या तिरक्या बोलण्याचा अर्थ कुणालाच समजला नाहीं. चौगुल्यानं त्याला विचारलं,

" मांगबिग पेलास काय ?"

" मांग ? इख घाला आतां—"

" असं कां बोलतुयास, रं ? "

" चौगुल्या, किती अब्रू असावी रं तुला ? बाकीची मेंढरं हायेत, पन त्येका तुला कळूं ने ? देशाव् संकाट आल्यालं हाय. हिमाल्याला आग लागलीया तकडं. रगत पडतंय्— (वास्तविक त्याला रक्त सांडतंय ' असं म्हणायचं होतं)—आपल्या लोकांचं, आन् जत्रा करतां व्हय ? समद्या गांवाला खडी फोडाय् लावायची हाय काय ? "

मदनशेटच्या या बोलण्यानं चौगुल्यासह बाकीच्या गांवकऱ्यानी तोंडात पचकन् बोट घातलं. कुणाला कांहीं बोलणंच सुघारेना. जिभा तुटल्यागत सगळे गप झाले. मदनशेटचंहि बरोबर होतं. देशावर एवढं संकट आलं असतांना गांवानं जत्रा तमाशांत वेळ घालवावा याला अर्थ आहे कां ? याला मुळीच अर्थ नाही. हें कुणालाच कसं सुचलं नाही याचंच प्रत्येकाला आश्चर्य वाटत होतं. प्रत्येक जण एकमेकाकडं पाहात होता. सगळयांचा उत्साह मातीला मिळाला होता. कुणीच कांहीं बोलांना म्हटल्यावर मदनशेटच पुन्हा म्हणाला,

" चिनी तकडं धांवत येतोय . . . हां हां म्हनतां दिल्लींत पिवळीं मानसं येतील. कावीळ झाल्यागत डोळयाला हुईल. सरकारनं इमरजन्शी ज्याईर केलीया . . . "

" ही आनि कसली एजन्शी हाय ? " बराच वेळ गप बसलेला नामू बोलला. स्पर्धा लावून मिळणार नाही इतका खुळा होता नाम्या शिंपी. त्यानं नुकतीच वर्तमानपत्राची एजन्सी घेतली होती.

" नाम्या, किती गाडया आक्कल असावी बरं तुला ! अमरज्यन्शी म्हनत्यात कळंना व्हय ? " बाळा मोघम या वेळेस निश्चित समजल्यासारखं बोलला, " आसंल काय तरी अमर होन्याचं औशद "

" मजी वैकुंटाला जान्याची एजन्शी व्हय ? " शिंप्यानें पुन्हां आपला प्रश्नाचा टाका घातला . .

" तकडंच जान्याची येळ आली हाय बाबानो ! " मदनशेट भाषण देऊं लागला, " इमरज्यनशी म्हंजे सगळा पैका सरकारला द्याचा. घरांत कांहीं खायचं नाहीं का कापडं घालायची न्हाईत. समद्याचा पैसा नेहरु सरकारांत जमा करायचा. आन् त्येच्या तोफा आणून चिन्यावर डागायच्या. न्हाईतर आतां कांहीं घडगत न्हाई बाबानो ! ! लाल झेंडे घेऊन पिवळी मानसं आलीच. नेहरुंची तर झोप उडाली हाय्. त्ये परवां म्हनालं की माझं सपान उलगलं . . . "

यांतलं खरं तर कुणाला कांहीं कळलं नाही. पण मदनशेटचं वक्तृत्व तालुक्याच्या सभा जिंकल्यालं होतं. सगळे मारावून जाऊन गप राहिले. शिंप्याला मात्र एक शंका मनांत ठसठसत होती. तो वर्तमान पत्रें वाचत होता. इंग्लंड अमेरिकेंत सुद्धां मंत्र्यांच्या जत्रेंत बाया नाच करून दाखवतात. मोठमोठ्या देशाचे मंत्री एकीकडे त्यांच्या बरोबर नाचून खेळून दुसरीकडे राज्य सांभाळतात. आपल्याकडंच असं कां बरं व्हावं ? का तशा नाच करून दाखविणाऱ्या बाया आपल्या हिकडं मिळत नाहीत म्हणून देशावर संकट आलं ? मग तशा बाया आपल्या मंत्र्यांना कुणी पुरवत कां नाही ?

छे: ! छे: ! नामूला कांहींच कोडं सुटेनासं झालं. कुणालाच कांहीं समजेनासं झालं. जत्रा आणि तमाशा राज्यांत स्वतंत्र करण्यांत आतां फारसा अर्थ नाहीं एवढंच मदन शेटचं म्हणणं आहे एवढं त्यांना कळलं. आणि नेहरुंची झोप उडालीच आहे तर आपण तरी जागरण करून कशाला जत्रा करायची असं वाटून चौगुल्यानं विचारलं,

" मंग आता इचार काय ? "

" इचार काय न्हाई.' मदनशेट सांगू लागला, " उद्या साताऱ्याला जाऊन समदं पैसं कलेक्टराच्या हातांत देनार. म्हननार, बाबा ह्यो धर माज्या गांवाचा पैका, आण त्याच्या गोळ्या न् घाल चिन्यास्नी खायाला. गांवाचं नांव झालं पायजेल. जत्राबित्रा आतां काय न्हाई. गांवकऱ्यांना तुम्ही दखल द्या..."

देशाच्या परिस्थितीची सगळयांनाच एकाएकी काळजी लागली. आणि 'जत्रा बंद' असं ठरवून 'राम राम' करून मंडळी उठली. जमलेली रक्कम दुसरे दिवशीं कलेक्टराला द्यायला जातो असं पुन्हां पुन्हां मदनशेट कां सांगत होता कांहीं कळलं नाहीं. दारापर्यंत जाऊन त्यानं सर्वांचा निरोप घेतला आणि तो घरांत वळला.

रात्रीचे आठ वाजून गेले होते. त्यानं बटन फिरवलं इमरजन्शीच्या बातम्या रेडिओवर चालू होत्या. आणि त्याची बायको त्याला आग्रह करीत होती,

" अवं, शीलोन लावा की... " ●●●

भारताच्या
दौऱ्यावर आलेला

# एम्. सी. सी. चा 'यंग इंग्लंड' संघ

दोन वर्षांपूर्वी भारत वि. इंग्लंड यामध्यें झालेले क्रिकेट सामने अत्यंत गाजले. आतां पुन्हा एकदा हें सामने गाजविण्यासाठीं एम्. सी. सी.च्या 'यंग इंग्लंड संघा' चे भारतात आगमन झाले आहे. त्याच संघाचा हा सचित्र परिचय........



माईक स्मिथ ▶

▼ एम. जे. स्टेवार्ट



बेरी नाईट ▼



अनुक्रमणिका



▲ केन वॅरिंग्टन



लॉर्टर ▶

### क्रिकेट, लव्हली क्रिकेट !

जाणत्याला या खेळाचें आकर्षण आहे, आणि तशा गुणाचे खेळाडूहि आहेत; नवें नवें पुढें येत आहेत. कसबाचे विविध ढंग आहेत. मध्यंतरी कांहीं वर्षें कांहीं श्रेष्ठींच्या कर्तबगारीमुळें अतिसावध, बेहिमती, वांझ खेळाची प्रथा पडली होती; सुदैवानें तिचें हंसे झाले. पुन्हा जुना दम उसळून येत आहे; पण क्रिकेट खेळासारखा खेळ होईल असा विश्वास वाटत आहे....

▼ एफ. जे. ट्रिमस



जॉन मार्टिमर ▶



अनुक्रमणिका





▲ जिम पार्कस

जे. एच. एड्रीच ▲

▼ जे. बी. बोलस

जे. एस. प्रिन्स ▼

जे. जी. बिंक्स







अनुक्रमणिका

# यंग इंग्लंड संघ



***सध्यां क्रिकेटक्षेत्रांत झटपट क्रिकेटवीर होण्याची एक सांथ निघाली आहे. ह्या सांथीला आळा घालून अव्वल दर्जाचे क्रिकेटवीर निर्माण करण्यावर एक निश्चित उपाय अव्वल दर्जाचे इंग्लिश टीकाकार श्री. रॉन रॉबर्टस् ह्यांनीं ह्या लेखांत सांगितला आहे. त्यांनीं इंग्लिश क्रिकेटला पाजलेला डोस भारतीय क्रिकेटलाहि मानवण्यासारखा आहे.***

**मला** एका गोष्टीचं राहून राहून आश्चर्य वाटतं. ती ही कीं फुटबॉलच्या खेळासाठीं इंग्लंड तरुण खेळाडूंचा संघ निर्माण करूं शकतं पण क्रिकेटसाठीं हा पराक्रम इंग्लंड कां करूं शकत नाहीं ? 'क्रिकेटचा तरुण संघ' असं इंग्लंडसंबंधीं वाचायला मी आतुर झालोय. पण योग अजून जुळून येत नाही. असं कां व्हावं ? तरणाताठा क्रिकेट संघ इंग्लंडला कधीं लाभेल ? ह्या दृष्टीनें प्रयत्न केले जातच नाहींत असं मी म्हणत नाही. दोन महिन्यांपूर्वी पूर्व आफ्रिकेंत गेलेल्या संघांत अवघे एक-दोन तर 'जुने' खेळाडू होते. जानेवारींत भारतांत सामने खेळणारा एम्. सी. सी. संघ मात्र फार मोठी जबाबदारी शिरीं घेत आहे. कारण त्या संघांत तरुण खेळाडूंचा भरणा जास्त आहे, म्हणूनच जबाबदारी वाढली–इंग्लंडची पत राखण्याची ! कारण भारतांत खेळले जाणारे सामने "अधिकृत" दर्जाचे आहेत !

वास्तविक पाहतां पूर्व-आफ्रिका व भारत ह्या दोन्ही देशांतील दौऱ्यांना शैक्षणिक महत्त्व अधिक आहे. त्या सामन्यांत आढळणाऱ्या चुरशीला मी तरी महत्त्व द्यायला तयार नाहीं.

सांप्रत तरुण खेळाडूंना क्रिकेटमध्यें संधि देण्याची इंग्लंडमध्यें एक लाट उसळली आहे. हा पवित्रा जरी स्वागतार्ह असला तरी तो उत्साहजनक निश्चित नाहीं. कारण तरुण खेळाडू निर्माण करण्यासाठीं एक पद्धतशीर योजना लागते, त्या योजनेचा इंग्लंड-संघांत अभाव आहे. तरुण खेळाडूंसाठीं नीट प्रयत्न केले गेले पाहिजेत, त्यासाठीं क्लबा-क्लबांतून, शाळा–कॉलेजांतून फलक झळकवावेत–'क्रिकेटर व्हा व जग पहा.' अशा तऱ्हेनें पद्धतशीरपणें सैन्यभरतीसारखीं क्रिकेट–भरती व्हायला पाहिजे. आता प्रत्येक दौरा डेक्स्टर, ट्रुमन व कौड्री ह्यांच्यावर किती दिवस निभावून नेणार ? म्हणूनच आतां सध्यांच्या तरुण खेळाडूंतून असें खेळाडू वेंचून काढले पाहिजेत कीं ज्यांना प्रवासापेक्षां खेळाची जास्त आंच आहे आणि दुसरें म्हणजे एम्. सी. सी. नें आतां असा संघ निर्माण करावा कीं ज्या संघांतील प्रत्येक खेळाडूचं वय पंचवीसच्या आंत असावं.

ह्या संघासाठीं एक अनुभवी मॅनेजर असावा. विली वॅटसन वा ॲलेक बेडसर-सारखा. पूर्वआफ्रिकेच्या दौऱ्यांत वॅटसनच मॅनेजर होता. देशांतील अव्वल दर्जाच्या तरुण खेळाडूंचाच ह्या संघांत समावेश व्हावा म्हणजे ह्या खेळाडूंकडून स्वतःच्या देशाची इभ्रत वाढविण्यासाठीं नेकीचे प्रयत्न केले जातील. असा हा 'तरुण संघ' तयार झाल्या-वर देशांतील 'प्रमुख संघा'बरोबर ह्या संघाचेहि दौरे काढावेत. एकाच वेळीं दोन संघ दौऱ्यावर पाठविण्याइतपत एम्. सी. सी. कडे खेळाडूंचा भरणा आहे. ह्या तरुण संघाला "Young England" असं सार्थ नांव द्यावं कीं ज्यामुळें लोकांच्याहि नजरेंत ह्या संघाचं महत्त्व भरेल; जे महत्त्व नुसतं- "MCC "A" Team म्हणून लाभत नाहीं! "यंग इंग्लड" संघाची ही कल्पना इसेक्स्च्या टॉम पियर्सनें बरोबर उचलून धरली आहे.

इंग्लिश क्रिकेटमधील एक दोष अगदीं ठळकपणें नजरेंत भरतो, तो म्हणजे क्लबांत खेळणारा खेळाडू व कसोटी सामन्यांत खेळणारा खेळाडू ह्या दोघांच्या 'क्रिकेट कौशल्यां'त फार तफावत पडते. ह्या दोघां-मध्यें ही एवढी मोठी तफावत कां ? ऑस्ट्रेलियांत व वेस्टइंडिजमध्यें ही तफावत जवळ जवळ नसतेंच. तेथील मामुली क्लबचा खेळाडूहि वेळ पडल्यास कसोटी सामन्यांतूनहि खेळावयास तयार असतो. पुन्हां तडफ दृष्ट लागेल अशी ! कसोटी सामन्यांत खेळतांना तो बिलकुल बिचकत नाहीं. एखाद्या सराईत खेळाडूप्रमाणें तो फ़टके मारीत असतो, चेंडू टाकीत असतो. काल 'शेफील्ड शील्ड' सामन्यांतून वा 'Colony XI' मधून खेळ-णारे खेळाडू आज कसोटी सामन्यांत खेळतांना आपल्याला आढळतात. न्यू साऊथ वेल्स् विरुद्ध व्हिक्टोरिया, वा बॅरबेडॉस विरुद्ध त्रिनिदाद हे सामने म्हणजे कसोटी साम-न्याची रंगीत तालीम ठरावेत ! त्या साम-न्यांत खेळणारा प्रत्येक खेळाडू पुढें कसोटी सामन्यांत खेळून देशाचं नांव उज्वलीत करतो ! इंग्लंडमधील "कौंटी" सामन्यांना अजून अशा तऱ्हेचं महत्त्व प्राप्त झालेलं नाहीं. "यंग इंग्लंड" संघ ही उणीव भरून काढील असा मला भरंवसा आहे. देशादेशांतून कसोटी सामन्यांच्या तोडीचे सामने खेळणारा "यंग इंग्लंड" संघ क्रिकेटच्या भट्टीतून चांगला तावून सुलाखून निघेल; शिवाय आज इंग्लंडमध्यें 'झटपट कसोटी वीर' होण्याच्या वृत्तीलाहि ह्या पद्धतीमुळें आळा बसेल. अलि-कडे 'कॅप' मिळविणं फार सोपं होऊन बसलंय.

१९६१–६२ सालीं भारत व पाकि-स्तानांत एम. सी. सी. जे आठ कसोटी सामने खेळली ते सगळे मी पाहिले. ह्या दौऱ्यांत मे, कौड्री, सुब्बा रो, ट्रुमन व स्टॅथम नसतांनाहि त्या संघाला 'इंग्लंडचा अस्सल संघ' म्हणणं








मूर्खपणाचं आहे; परंतु तरीहि त्या सर्व सामन्यांना शिक्का लागला तो 'अविकृत' सामन्यांचा आणि विनाकारण इंग्लंडचा भारतांत पराभव झाला !

ह्याच दृष्टीकोनांतून बघितलं तर असं म्हणावं लागेल कीं भारतांत आतां दौऱ्यावर असलेला "एम्. सी. सी." चा संघ हा 'अस्सल इंग्लिश संघ' मुळींच नाहीं. असं असूनहि हा संघ जे कसोटी सामने खेळणार आहे ते सगळें "अविकृत" दर्जाचे आहेत ! आणि पुढील हिवाळ्यांत इंग्लंडचा संघ जेव्हां दक्षिण आफ्रिकेच्या दौऱ्यावर जाणार आहे तेव्हां इंग्लंडचे सगळे अतिरथी, महारथी ह्या दौऱ्यावर आहेत आणि असं असूनहि तेथें खेळले जाणारे कसोटी सामने हे "अनधिकृत" दर्जाचे ठरणार आहेत. हा कठोर विरोधाभास मला समजतच नाहीं !

परंतु ह्या परिस्थितींत मी "एम. सी. सी."ला दोष देत नाहीं कारण सामन्यांना "अधिकृत" दर्जा देण्याच्या भारतीय क्रिकेट मंडळाच्या अट्टाहासाला "एम्. सी. सी."ला नाहक बळी पडावें लागलें. ! गल्ल्यावर निव्वळ पैसे जमायला हवेंत म्हणून भारतीय क्रिकेट मंडळ हा "हट्ट" धरतें. म्हणजे क्रिकेट मंडळ ह्या गल्लाभरु वृत्तीला क्रिकेटपेक्षां अधिक महत्त्व देतें ! भारत "एम्. सी. सी." ऐवजी इंग्लंडबरोबर खेळतोय् असं म्हटल्याबरोबर साहजिकच गर्दी होणार. भारताच्या दौऱ्यांत धनलाभ चांगला होतो म्हणूनच "एम्. सी. सी." भारतांत नांव बदलून यायला तयार असते. सध्यांच्या दौऱ्याचाहि प्रमुख हेतु हाच आहे, हें आतां गुपित राहिलेलं नाहीं.

"यंग इंग्लंड" नांवाखाली जर भारतांत संघ जाईल तर तेथें होणाऱ्या कसोटी सामन्यांना, "यंग इंग्लंड" विरुद्ध भारत पहिला कसोटी सामना, दुसरा कसोटी सामना इत्यादी नामावळी देतां येईल. ह्या सामन्यांमुळें आंतरराष्ट्रीय क्रिकेटमध्यें कोणाचीहि पत जाण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाहीं. शिवाय आज जी कसोटी सामन्यांची हेळसांड होत आहे तीहि होणार नाहीं.

परंतु सध्यांतरी "यंग इंग्लंड" ची कल्पना मूळ धरत नाहीं तोपर्यंत पाहूं यां "इंग्लंड" चा बुरखा परिधान केलेला हा "यंग इंग्लड" संघ भारतांत कोणता पराक्रम गाजवतो तें !

रुपांतर :–**शर्विलक**

●●●

[ स्पोर्ट अॅण्ड पास्टटाईमच्या सौजन्याने ]

# तं बो रा



—सिनिक्

**बाई** आल्या आणि मैफिल शांत झाली. गेली पंचवीस वर्षे जिथें जिथें बाई गेल्या तिथें तिथें असें व्हायचें. वास्तविक एक मधुर गळ्याची सुमार दिसणारी बाई परंतु तिच्या व्यक्तिमत्वाला वजन होते. मान्यता होती. सुगम संगीताचे चाहते आणि रागदारीचे दर्दी, दोघेहि बाईच्या आवाजावर फिदा होते. बाईचे श्रोते तरुणांचे प्रौढ, प्रौढांचे बुर्जुग झाले होते आणि कुमाराचे तरुण होत होते. कमी होत नव्हते. वाढत होते. वाद न घालता, पक्ष न घेता स्वर ऐकत होते. सुस्वर होत होते. कर्णमय होत आणि सारे विसरत होते——

सांवळा रंग, भव्य कपाळावरचे मोठे कुंकु, मानेवर रुळणारा भरघोस अंबाडा यांत ऊनपाऊसांना कांहींहि अफरातफर करता आली नाही. अगदी वेळेवर बैठकीला यावयाचे आणि आपल्या जागी स्थानापन्न व्हायचे. प्रथम तंबोऱ्याला ताब्यांत घ्यावयाचे आणि नंतर स्वतः तंबोऱ्याच्या ताब्यांत जावयाचे. त्याच्या आधीन राहावयाचे. तीन ते पांच-पांच तासांच्या अभंग गायकींत फक्त दोन बोटें खालीवर व्हावयाची. मारलेली मांडी अखंड असायची. श्रोते माना डोलवायचे, सारंगीवाल्याच्या टोपीचा गोंडा गिरक्या घ्यावयाचा, तबलजीचा आणि तबल्यावरचा मुखडा घुसळून घुसळून बदलावयाचा पण बाईच्या आसनांत फरक पडावयाचा नाहीं. बाईंना जवळपासची माणसें रोखून पाहावयाची. वेध घ्यावयाची. कुठें गहिरी, कुठें भेदक अशी नजरेची फेक पिंडापिंडांतून बाहेर पडावयाची. पण बाई जणू अस्पर्श होती. तिच्या शालीन व तृप्त दृष्टीत कसलीच लाट उठावयाची नाही. फार तर 'वाहवाऽऽ'ला किंचित वर झालेल्या चेहऱ्यावर मंद बारीक स्मित दिसावयाचे मूळांतच प्रसन्न असलेली आभा आणखीन उजळून निघे.

गाणाऱ्या बायका कां कमी पाहिल्या आहेत ?–आकाशवाणीच्या आधाराने त्यांची मुळीच वाण नाही. प्रत्येकीची तऱ्हा आणि तंत्र ही नव्या नवलाईनं नटलेली. प्रतिसाद हमखास आहे म्हणून उत्साहानं फुललेली. कपाळावर ओणवणारी चावट बट, रंगीन ओठांवर लबाड हंसू आणि फुगीर गालावर फसवी लाली,–आणि गीतांचा, ठुमऱ्यांचा नखरेल आलाप——! परवां तर बावीस वर्षांची मंजुळा बैठकींत आली, तंबोरा घेतला आणि एक नजर सर्वांना पाहून तिनें तंबोऱ्यावर मान टाकली. तिच्या आखूड कुरळ्या केसांच्या सैल वेण्या खांद्यावरून तंबोऱ्यावर कलल्या. उपस्थितांना वाटले कीं हे दृश्य स्थिर व्हावे, राहावे अन् मुळीच बदलू नये. हलूं नये——कुणी पेहरावच रुबाबदार करून येईल—कुणी माळलेली वेणी आणि लावलेलें अत्तर यानेच वातावरणाला धुंद व माणसांना बेहोष करेल. कांहीं दिवसापूर्वी ती लखनउची—काय नांव बरं ? नाही आठवत—वाटलं कीं आता बुढ्डी झाली तेव्हा आवाज पसरट झाला असेल. ती 'धुनें'






आता काय दर्दभरी राहणार ? दर्द काळजाला जाऊन भिडणारी अदाच नसली तर—पण यार लोक म्हणाले 'कशाला म्हणजे कशाला तार नाही—'आम्हाला जरा उशीर झाला. बैठकींत तिला पाहिलं——कॆंस मोकळे सोडलेलें, डोळ्यांत सुरमा, आणि मनगटावर मोतियांचा गजरा—तोच किंचित पिवळी छटा असलेला गोरा रंग अन् कुठेहि सुरकतीचे नांव नाही. मदभऱ्या नजरांना रसिली मुस्कराहट—अशरण कुणीच राहिला नव्हता—म्हाताऱ्यांची जवानी जागली होती—आणि तरुणांची जवानी नव्याने फुलत होती–पेटत होती–आणि 'खाजे के कवर परऽऽ'ची करुण सुरावट—आम्हाला वसण्याचेहि भान राहिले नाही——

—मात्र वाई या रंगाढंगांना निखळ अपवाद होती. अपवाद असून माणसं खिळवून ठेवत होती. वाईचा पोशाख ? इतक्या रात्री ऐकल्या पण हें कांहीं नजरेपुढं येत नाही. आठवत नाही. मनांत ठसलेलं नाही. वेगवेगळे गाणे ऐकण्यापूर्वी, ऐकतांना आणि ऐकल्यावर त्या त्या घराण्यांची चर्चा व्हावयाचीच. पण वाईच्या गाण्याच्या संबंधात मात्र मनांत सतत सूर घोळायचें खडीसाखरेसारखीं त्यांची मिठ्ठास मनाच्या सगळ्या पापुद्र्यांतून पाझरत राहावयाची. नादब्रह्मानं पुलकित झालेलं मन या गोडव्यानं 'फलभार' व्हायचं. रसरसून जायचं वाईची साथ बदलली, गाणं बदललं नाही. गाण्याच्या बाबतीत तें पडलं असं चुकूनहि कानांवर यायचं नाही. आलंच तर 'आज वाई फारच छान गायिल्या' असं यायचं. मला आपलं नेहमी वाटायचं 'म्हणजें काय झालं' पुन्हा असंहि वाटायचं कीं वाईबरोबर साथ करणाऱ्यांनाच विचारावं या बाबतीत—

नुकतेच वाईचे गाणें झालें तेव्हा जुना उस्ताद तबल्याच्या साथीला होता. वाईचे गाणें फारच रंगलें असा सर्वांचा अभिप्राय होता. परततांना उस्तादबरोबर होतो.

मी उस्तादला विचारलें—

'हूं'ऽऽऽ काय ?'

'खरंच बऱ्याच दिवसांनी वाई आज दिल खोलून गायिल्या.'

'तुम्ही साथीला होता म्हणून–'

'तसं नव्हे—पण कारण सांगणं मुश्कील आहे...'

'उस्ताद एक विचारूं ?'

'विचार कीं –'

'तुम्ही पुष्कळांची साथ केली–शाबासकी मिळवली. वाईनी कधीं शाबासकी दिली ? तुम्ही खुश होऊन मुंडी हलवावी, थाप मारावीं, डग्गा घुमवावा, समेवर यावं आणि वाईची सोत्साह साद मात्र नसावी...तुमचा उत्साह भंग होत असेल नाही ?'

'समजण्यावर आहे साहेब. वाईची सारी हरकत गळ्यांत. साथ आवडली तर पाहतां पाहतां रागाची खुलावट होते आणि वाजवणारा उत्स्फूर्त होतो. साथ बरोबर नसेल तर वाईचा आवाज मातेच्या प्रेमानं सारं सांवरून घेतो. वाजवणाऱ्याला हे कळतं आणि त्याच्या कलेचं इमान जागं होतं...या सर्वांत वाईचं अवधान तंबोऱ्याशीं तादात्म्य पावण्यांत असतं. या तादात्म्यामुळेच वाई आणि तंबोरा यांचे अद्वैत आहे...आणि पाहण्यांत नाही—मला तर केव्हा केव्हा वाटते कीं वाई तंबोऱ्याच्या सूराशी इतक्या एकरूप झालेल्या असतात कीं त्या विदेही होतात. वाईची आणि तंबोऱ्याची अवस्था 'सुंदर तें ध्यान' बनते. ते अविचल जे असतं त्याचं हे रहस्य आहे. त्यांचं गाणं कधींच बेरंग होत नाही त्याची ही गोम आहे. साहेब, आम्ही वाईंची साथ करतो पण आम्हाला सारखं वाटतं कीं वाईंना आमची साथ नसेल तर त्यांचे मुळीच अडणार नाही. पण तंबोरा नसेल तर वाई गाउ शकणार नाहीत. वाईचे तनमन आणि स्वर तंबोरामय होतं आणि आम्ही त्याच्याशी समरस होण्याकरिता धडपडत असतो. तबल्यावर लिलया नाचणारी ही बोटे विजेच्या गतीनं फिरत घेतात, लय साधतात. पण देह कांहीं सोडत नाहीत....वाईच्या स्वरामागेच राहतात, नुसता मागोवा घेत...पण..पऽऽण–'

'पण' जवळ येऊन आणि त्याचा पुन्हा उच्चार करून उस्तादने उसासा सोडला. मलाहि कुठेंतरी तार तुटल्यासारखें वाटलें. मी अधीरतेनें विचारलें 'पण काय उस्ताद?'

'पण इतकीच इच्छा आहे कीं या जन्मी नाही तरी निदान पुढच्या जन्मी तरी त्या तंबोऱ्याच्या रुपानं जन्म घ्यावा——'

●●●

(टीप :—पॉप्युलर प्रकाशनतर्फे प्रकाशनाच्या वाटेवर असलेल्या लेखकाच्या आगामी कथा संग्रहांतून )



तुला खरं सांगू कां, सरळ आपला माझ्यामागून परत फिर . . .

--बाळ ज. पंडित, एम. ए. एलएल्. बी.



*एकदाचं पंतप्रधान होणं सोपं जाईल. पण क्रिकेटचा कप्तान होणं किती अवघड आहे....हे आतां आपल्या अनुभवास येईलच........*

# मी कप्तान होतो

'**पंतप्रधान** होण्यापेक्षा कुठल्याहि संघाचा कप्तान होणं हे किती अवघड आहे ते मला विचारा ! लहानपणी शाळेतल्या निबंधात ५० विद्यार्थ्यांपैकी पंतप्रधान होण्याची इच्छा धरणारा मी ४५ वा होतो ! ही लहानपणची चूक मी बरीच वर्षं मनांत बाळगली होती ! पण मोठं झाल्यावर आणि कळू लागल्यावर (म्हणजे नुकतीच) ही कल्पना मी सोडून दिली ! देशात ४५ पंतप्रधान झाले तर देशाचे कितीपट हाल होतील याची भयंकर जाणीव शिक्षकांनी करून दिल्यामुळेच मी तो विचार सोडण्याचा सुविचार केला ! पण माझे इतर ४४ सहाध्यायी मात्र अजूनहि दिल्लीच्या आमंत्रणाची वाट पहात तिष्ठत, ताटकळत बसले आहेत ! मी पंतप्रधान होण्याची कल्पना सोडली आणि क्रिकेटचा कप्तान होण्याचं ठरवलं. त्यामुळें देश एका लायक पंत-प्रधानाला मुकला ! पण त्यामुळें क्रिकेटचे मात्र फार फायदे झाले ! आता माझ्या नेतृत्त्वामुळें क्रिकेटचे फार फायदे झाले कीं माझे स्वतःचे अधिक फायदे झाले हे जरी सांगता येणं कठीण असलं तरी एवढं खरं कीं क्रिकेटचा नेता होण्यानं अनेक फायदे होतात.

वर्तमानपत्रांतील प्रसिद्धी, फोटो, मुलाखती, कमीत कमी दहा लोक आपल्या आज्ञेत वागत असल्याचा अभिमान, त्यामुळें घरांत वाढणारी किंमत–वगैरे अनक गोष्टी कप्टन होण्यानं–साध्य होतात ! आपण फारसे श्रम न घेताहि हाताखालच्या खेळाडूंच्या प्रयत्नावर मिळ-णाऱ्या विजयाचे सारे श्रेयहि कप्तान झाल्यास आपल्यालाच मिळते ! हाहि कांहीं थोडा थोडका फायदा नव्हे. याचमुळें प्रसंगी 'पद्मश्री' ही पदवीहि सहज मिळवता येते ! हे सगळे फायदे अजमावून मी कप्तान होण्याचाच ध्यास घेतला.

परंतु हा मार्ग अधिक खडतर असल्याचंच मला दिसून आलं. मी एक वेळ बोटीच्या नॅव्हल स्टॉफचा कॅप्टन झालो असतो, किंवा भारतीय फौजेत कॅप्टन या असाध्य (?) पदवीपर्यंतहि चढलो असतो पण क्रिकेटचा 'कॅप्टन' होणं म्हणजे महाकर्म कठीण. पूर्वी क्रिकेटकप्तान होण्याचा मला अनुभव नसला तरी मी 'फ' वर्गातील चौथ्या गटाच्या लंगडी टीमचा 'कॅप्टन' झाल्याचं पुसट आठवतं ! त्यावेळीं आमचा खरा कप्तान लंगडी खेळतां खेळतां घसरून खरो-खरच लंगडा झाल्यानं माझ्यावर 'कप्तान' होण्याचा पहिला प्रसंग गुदरला होता. नेमलेल्या कप्तानाच्या अनुपस्थितींत कां होईना पण 'डी फॅक्टो' का 'डि ज्युरे' यापैकी काय म्हणतात तसा कप्तान मी झालो होतो. हा पहिला अनुभव सोडला तर मी एकदा आट्या-पाट्याच्या सामन्यांत उपकप्तान आणि हुतुतुच्या सामन्यांत कधीहि 'हुतुतु' करत दुसऱ्या पाटीत न गेल्यानं आणि (तेवढ्यामुळंच) आमच्या पाटीत एकटा उरल्यानं– अर्थातच त्यावेळीं कप्तानपद आमच्याकडे 'चालून' आलं होतं !

क्रिकेटमधला नसला तरी इतर खेळांतला एवढा सगळा बहुमोल अनुभव जमेस धरता मी क्रिकेटचाहि एक (तितकाच) चांगल्या-पैकीं कप्तान होईन असं मला सकारण वाटूं लागलं ! कुणीहि कप्तान झाला तरी सामन्याच्या निकालांत फारसा फरक पडत नाही हे ठाऊक असल्यानं मीही कप्तान झाल्यास आमचे खेळाडु मुळीच हरकत घेणार नाहीत असा माझा विश्वास होता. विशेषत: प्रतिपक्षांतले खेळाडूं तर फारच आनंदित होतील याची मला खात्री होती–! कुणाला कां होईना, माझ्या कप्तानपदामुळें आनंद झाल्याशीं कारण !

कॉलेजमध्यें असतांना आमच्या क्लासमधील एकचतुर्थांश मुलींची आणि म्हणूनच आलेल्या तीन चतुर्थांश मुलांची ट्रीप चुकलेल्या फकिराप्रमाणें नेहमीसारखीं कार्ल्याला गेली होती ! तिथं आमच्या प्राध्यापकांना कांहीं महत्त्वाच्या कामामुळ एका प्रोफेसरणीबरोबर शैक्षणिक विषयावर गंभीर चर्चा करण्यासाठीं दूर जावं लागल्या कारणानं आमच्या सामुदायिक भोजनप्रबंधाला जो अर्धा–पाऊण तासाचा दीर्घ अवधि लागला होता तेवढ्या वेळांत आमच्यापैकीं कांहींनी 'उभा खो खो'चा मिक्स्ड खेळ केला होता. त्यांत मी

पुरुषांचा (अर्थातच !) कप्तान झालो होतो पण तीथंहि आमच्या पैकींच एका प्रेमवीरानं मला 'खो' दिल्यामुळें तो प्रमुख कप्तान झाला आणि मी (माझ्या मतें) उपकप्तान झालो. खो खोच्या खेळांत खऱ्या कप्तानाला 'खो' देणारा तो अजब प्रेमवीर आज अनेक प्रेमप्रकरणांत 'खो' आल्यानं आपल्या पूर्वकर्मांबद्दल पश्चात्ताप करीत बसला आहे असं समजतं !

शालेय जीवनांतील कप्तानपदाच्या अनुभवांत महाविद्यालयामध्यें ही भर पडली आणि नंतर इतर अनेक पदवीधराप्रमाणें आम्हीहि जेव्हां नोकरीत आणि नोकरीनंतर संसारांत पडलो तेव्हां त्याराच अनुभव आला. ऑफीसमध्यें एकपदरी पदवीधर कधींच कोणावर हुकमत गाजवूं शकत नाही असा जागतिक सिद्धांत असल्यानं ऑफिस-मध्यें नेतृत्त्व गाजवण्याचा विचारच मी सोडून दिला आणि घराकडे वळलों ! पण तीथंहि स्वयंपाकघराचा कबजा आमच्या अर्धांगिनीनं आधीच घेतल्यामुळें त्या ठिकाणीं पाऊल टाकण्याची हिंमत आमच्या अंगांत कधीहि झाली नाहीं ! स्वयंपाकघरांतील आमची माघार लक्षांत घेऊन आमच्या सौ. नं. पाहतां पाहतां दिवाणखान्याचा प्रदेश माझ्यापासून हस्तगत केला आणि तो संपूर्ण 'व्यापून' टाकला ! तिथं तिच्या महिला—मंडळाचाच मुक्त संचार सुरुं झाला ! त्या महिला-मंडळाची 'कॅप्टन' आमची 'ही'च असल्यानं तिच्या नेतृत्त्वाच्या अनुभवांत सारखी भर पडत गेली आणि थोड्याच दिवसांत ती आमच्यावरहि हक्कानं नेतृत्त्व गाजवूं लागली ! अशारीतीनं घरच्या आणि दारच्या क्रीडांगणावर जर कर्णधारपद यशस्वीपणें गाजवता येत नाही तर मी क्रिकेटचा कसला कप्तान होतो अशी भिती सुद्धा महत्त्वाकांक्षेला सारखी टोच मारुं लागली आणि त्यामुळें माझी जिद्द अधिकच फळफळू लागली !

एकूण कुठल्याहि प्रकारचं नेतेपण मिळवणं आणि 'गाजवणं' हे किती अवघड आहे हे मला आता पटू लागलं होतं. पण घरचें व दारचें असें अनुभव जमेस धरूनसुद्धां माझं मन मात्र स्वस्थ बसायला तयार नव्हतं. काय वाटेल ते प्रयत्न करावें लागले तरी चालतील, ते करायचे... पण कप्तान व्हायचं ! कप्तान व्हाय-लाच इतके प्रयत्न करावें लागतात तर कप्तान झाल्यावर कुठल्या अडी-अडचणींना तोंड द्यावं लागेल या विचाराशी सध्या मला कर्तव्य नव्हतें ! अगोदर कप्तान व्हायचे, मग बाकीच्या गोष्टींचा विचार ! आमच्या संघांत अनेक बाजारबुणगे देखील आत्तापर्यंत कप्तान होऊन गेले होतें ! तेव्हां मी सहज कप्तान होऊ शकेन असा आत्मविश्वास मला वाटूं लागला ! याखेरीज अनेक कप्तानांनीं मला फार खराब आणि अपमानास्पद वागणूक दिलेली होती. त्यामुळें माझं मन डिवचलं गेलं होतं. संघाला (आणि मला) या कप्तानशाहीपासून सोडवण्याचा एकच मार्ग होता. आणि तो म्हणजे मी स्वत: कप्तान व्हायचं ! मीहि कांहीं कच्च्या गुरुचा चेला नव्हतो ! आमच्या कप्तानांनीं कोणत्या दरवाजानं कप्तानपद मिळवलं आहे हें मला ठाऊक होतं. भारतीय कप्तानांनीहि सुदैवानं याबाबतींत अनुकरणीय उदाहरण घालून दिलेलंच आहे. आपणहि त्या मार्गानें कप्तानपद मिळवायचं आणि साऱ्या जुन्या कप्तानांना आपल्या हाताखालीं खेळवून त्यांनी जशी 'ट्रीट मेंट' दिली तशीच आपण त्यांनाहि द्यायची ! झालं, ठरलं !

एकंदरींत, स्वार्थ व परमार्थ साधण्याच्या उदात्त हेतुनं मी कप्तानपदाच्या मागं लागलो होतो. पण कप्तानपद मात्र माझ्या मागें लागलेलं नाही असं मला लौकरच कळून चुकलं ! संकल्प आणि सिद्धी यांत महदंतर असतं हे मला फलंदाजी-गोलंदाजी व क्षेत्ररक्षणाच्या वेळीं पुरेपूर पटलंच होतं. पण कप्तानपदाच्या बाब-तींतहि तसाच अनुभव येईल असं मला कधीहि वाटलं नव्हतं !

माझ्या कडवट अनुभवांनीं मला एक गोष्ट शिकवली व ती म्हणजे कप्तान व्हायचे झाल्यास माझ्यासारख्या महत्त्वाकांक्षी उमेदवारानं देखील बरीच पथ्यं पाळावी लागतात हे मला समजून चुकलं ! एक तर असं कीं मांडवल घालून स्वत:चा क्लब काढल्याशिवाय कुणीहि आपल्याला कप्तान करणं शक्य नाही असं मला मित्र-परीवारांत कप्तान झालेल्यांच्या उदाहरणांवरून स्पष्टपणें दिसून आलं ! उगीचच टेंभा मिरवणाऱ्या आणि नाकानं वांगी सोल-णाऱ्या कप्तानांच्या पूर्वेतिहासाचा मागोवा घेतल्यानंतर मला ही "अंदरकी-बात" कळली होती. मेल्याशिवाय स्वर्ग दिसत नाही तो असा ! पण मला न मरता स्वर्ग बघायचा होता, खर्च न करता कप्तान व्हावयाचं होतं ! आजच्या महागाईच्या काळांत पैशाविशाच्या गोष्टी मला अशक्यकोटीतल्या होत्या. आणि शिवाय पैशाच्या मोबद-ल्यांत विकत घेता येईल इतकी कप्तानपद ही 'सस्ती चीज' नाही असं माझं विचारांती बनलेलं ठाम मत होतं ! तरीपण खोटं कशाला बोला ? स्वत: क्लब काढून कप्तान होण्याचा विचार एकदा माझ्या मनांत येऊन गेला होता खरा. चार चौघांत मी तो बोलूनहि दाखवला होता. पण मी कॅप्टन होणार हे जाहीर होताच खेळाडू आणि सामने हे दोन्ही मिळण्यांत बांधे येऊ लागल्यामुळें तो बेत मला अर्धवटच सोडून द्यावा लागला. स्वत:चे खिसे रिकामे करून क्लब स्थापणाऱ्या मूर्खाच्या डोक्यावर कप्तानपदाची विदुषकी टोपी ठेवण्यांत येते असं तेव्हापासून माझं विचारांती बनलेलं दुसरं एक ठाम मत झालं!

पण यालाहि एक पर्याय असल्याचं माझ्या लौकरच ध्यानांत आलं. कप्तान व्हायचं असल्यास स्वत:च्या क्लबाचा मालकच

---

**विचित्र रोग !**



इंग्लंडच्या यॉर्कशायर परगण्यांतील एमेट या प्रख्यांत गोलंदाजाची एक गोष्ट आहे ती अशी—

एका सामन्याच्या वेळीं त्याच्या संघा-तील क्षेत्ररक्षकांनी झेल सोडण्याची इतकी परमावधि गाठली कीं त्याने त्रासून चेंडू जमिनीवर जोराने आपटला आणि दुःखित अंतः-करणाने त्याने आपल्या कप्तानाला सांगितले, "मी कांही आतां यापुढें गोलंदाजी करणार नाही. या मैदानावर कसला विचित्र रोग फैलावला आहे देव जाणे ! परंतु आतां दैवाने एवढीच खैर करावी की मी क्षेत्ररक्षण करीत असतां मला तो होऊं नये."

---

व्हायला पाहिजे असं नाहीं, तर दुसऱ्याच्या क्लबचा सेक्रेटरी झालं तरी चालतं ! त्यामुळेंहि काम भागूं शकतं ! शिवाय सेक्रेटरी होण्यांत डबल फायदा असतो. आपल्या (हे महत्त्वाचं !) मांडवलाला बिलकूल धक्का लागत नाहीं. "अगोदर मालक व्हा आणि मगच कप्तान व्हा." असा इथं नियम नसतो. इथं लोकशाही मार्गानं तुम्ही सेक्रेटरी होता आणि नंतर बिनविरोध कप्तानहि होता ! कप्तानाची खुर्ची तुमच्यासाठीं वाटच पाहात असते. असा हा लोकशाही नेता सेक्रेटरी म्हणून कर्तव्यदक्ष असला म्हणजे मग तो कप्तान म्हणून अननुभवी असला तरी चालतो ! भरलेली फी वसूल होईपर्यंत सभासदांना जोपर्यंत तुमच्या संघाकडून खेळणंच भाग असतं तोपर्यंत तुमच्या नेतृत्वाला त्यांचा कायिक, वाचिक, मानसिक विरोध नसतो. आणि विरोध असला तरी तो मोडून तुम्हीं नेतृत्वाच्या खुर्चीला चिकटून राहू शकता. कारण सेक्रेटरी या नात्यानं त्यांच्या संघामधील निवडीच्या आणि फी मधील सवलतीच्या किल्ल्या तुमच्याच हातात असतात ! सेक्रेटरीपुढं कुणाची बोलायची ताब नसते. ही गोष्ट कप्तान झालांत कीं तुमच्या पथ्यावरच पडते !

सारांश, सेक्रेटरी होऊन कप्तान होणं, हा नेतृत्वाचा मान मिळवण्याचा पुढचा दरवाजा आहे ! पर्सनल असिस्टंट होऊन जसं गृहणीपदाचा मान मिळवता येतो, तसाच क्रिकेटमधला हाहि एक राजमार्ग आहे ! मी सेक्रेटरी होण्याचे बरेच वेळा प्रयत्न करून बघितले.' परंतु उपयोग झाला नाहीं. प्रथम कॉलेजमध्ये हा प्रयोग केला. निवडणुकींत निवडून आलेलें सोमेगोमे केवळ तेव्हढ्याच एका 'क्वालीफिकेशन'वर मंत्री होतात तद्वतच कॉलेजचे क्रिकेट-सेक्रेटरी बहुमतवाल्यांचे प्रतिनिधित्व सेक्रेटरी म्हणून केवळ मैदानाबाहेर नाहीं तर कप्तान म्हणून मैदानावरहि हक्कानं करतात ! परंतु माझ्याबाबतीत प्रत्येक ठिकाणी निराळा अनुभव कां येतो कुणास ठाऊक. पाटर्या घेणं हे मला ठाऊक आहे पण पाटर्या देणं हा प्रकार बहुधा मला अज्ञातच राहिला आहे. अर्थात् पाटर्या दिल्याशिवाय सेक्रेटरी होता येत नाही असा रिवाज असल्यानं मला सेक्रेटरीपद मिळत नाही आणि त्याचमुळें कप्तानपदहि ! कदाचित् मी अगोदर कप्तान होईन पण सेक्रेटरी होणं जन्मांत शक्य नाही ! कप्तान होऊन एखादे वेळीं मी सेक्रेटरी होईनहि परंतु सेक्रेटरी होऊन कप्तान होणं अशक्य ! परंतु तरीहि एकदा मी सेक्रेटरी होण्याचा प्रयत्न करून बघितला होता. क्रिकेट-सेक्रेटरीचं इलेक्शन कॉलेजमध्यें नेहमी गाजत असतं. या इलेक्शनमध्यें मुलीहि मतदार म्हणून मोठ्या संख्येनं भाग घेतात, त्यामुळें बऱ्याच जणांना क्रिकेट येत असल्याचा अकस्मात साक्षात्कार होतो आणि म्हणून कितीतरी उमेदवार उभे राहातात. मी उभा राहिलो तेव्हा विलक्षण अनुभव आला. मुलं मतं द्यायला तयार झाले पण त्यांनी एक अजब अट घातली. मुलींनी माझ्या बाजुनं कॅन्व्हासिंग केलं पाहिजे ! असाच त्यांचा आग्रह पडला. मतदारांचा हा बालहट्ट पुरवणं माझ्या हातात नसल्यानं आम्ही निवडणूकींत सपशेल आपटी खाल्ली. मुलींची ओळख करून घेण्याचा निवडणूक हा एकच मार्ग असेल तर तो मला बंद आहे हे मला समजलं ! सेक्रेटरी न झाल्यानं आम्ही त्या वर्षी कॉलेजचे कप्तानच काय पण साधे खेळाडू म्हणूनहि चमकलों नाहीं हे सांगणं नकोच !

शेवटी एका क्लबमध्ये मी नांव नोंदवलं आणि कप्तान होण्याचा चान्स तिथं तरी मिळतो की नाहीं याचा प्रयोग करून बघण्याचं ठरवलं. यासाठीं मला बरेच सायास आणि नवसायास करावें लागलें. संघातून नित्य वगळले जाणारे जे (बरेच) खेळाडू होते त्यांच्या कळपात शिरून मी त्यांना विश्वासात घेण्याचा प्रयत्न करू लागलो. ही संख्या वाढती असल्याने आमचा गट फुगू लागला. या गटांत रोज सायंकाळी बौद्धिक घेण्याचा मी 'परिपाठ' सुरू केला आणि रोज एक 'पाठ' देऊ लागलो. संघात कप्तानाचं महत्त्व किती मोठं आहे हे मी त्यांना पटवून देण्याचा सपाटा चालवला. नगाव कप्तान असला की संघाचे, खरं म्हणजे देशाचे, म्हणजेच पर्यायानं आंतरराष्ट्रीय क्रिकेटचं कसं नुकसान होतं हे मी त्यांना घसा कोरडा होईपर्यंत स्पष्ट करून सांगू लागलो. "कप्तान म्हणजे संघाचा प्राण", "चांगला कप्तान म्हणजे क्रिकेटचं भूषण" वगैरे सुभाषितं त्यांच्या तोंडावर फेकून सेक्रेटरी हा कप्तान कां होऊ नये, सध्या संघाची स्थिती किती केविलवाणी झाली आहे. आणि त्यावर मी कप्तान होणं हाच एक रामबाण उपाय कसा आहे हे मी त्यांना आवर्जून पटवून लागलो. हे करतांना मी कॉलेजमध्यें किती वर्षं कप्तानपद गाजवलं व सामने किती जिंकले याची रसभरीत (पण काल्पनिक) वर्णनं प्रत्येकाला वेगळं गांठून सांगायला कमी केलं नाहीं.

**'लॉंग, लॉंग इनिंग्ज'**



**बरं का, त्यानें गेल्या इनिंगमध्यें जास्त ओव्हर्स टाकण्याचा विक्रम केला !**

यानेहि जेव्हां फारसा परिणाम झाला नाहीं तेव्हां "क्लबच्या अधिकाऱ्यांनी प्रत्येक सामन्यासाठीं निराळा कप्तान नेमण्याचं धोरण चालू करावं." हे तत्त्व मी प्रतिपादन करू लागलो. यामुळें सगळ्या खेळाडूंना उत्तेजन मिळतें आणि सर्वांना क्लबबद्दल आपलेपणा वाटूं लागतो हा माझा मुख्य मुद्दा होता. क्लबची सर्वांगीण प्रगति व्हावी या कळकळीनं आणि विशुद्ध हेतुनंच मी ही सूचना पुढं मांडली होती ! त्यांत स्वार्थ नव्हता ! देशांत विशेषत: महाराष्ट्रांत आज लायक नेत्यांची वाण आहे. क्लबनं जर नेतेपणाचं वाटप केलं आणि पुष्कळांना आवश्यक तो अनुभव व सराव दिला तर महाराष्ट्राला उत्तमोत्तम 'सराईत' नेते मिळतील आणि आयतंच राष्ट्रकार्य केल्या-सारखंहि होईल. माझ्या या विचारसरणीची छाप क्लबच्या अधिकाऱ्यावर पडणार असा रंग दिसू लागला.

आणि नंतर एक दिवस मला बातमी कळली की क्लबनं माझी कल्पना ग्राह्य ठरवली असून ती कार्यवाहीतहि उतरली जाणार आहे. माझा आनंद यावेळीं क्रिकेटच्या मैदानांतहि मावेनासा झाला ! झालं— प्रत्येक सामन्यांत कप्तान बदलण्याचं सत्र सुरुं झालं. आड-नांवाप्रमाणे क्रम ठरला. इतरांच्या सुदैवानं आणि माझ्या दुर्दैवानं इथहि मी 'क्यू'त शेवटी आलो. पण 'क्यू' त आलो हे काय कमी झालं ? आता केव्हा तरी कप्तान व्हायला मिळणार हे नक्कीच ! मी स्वप्न रंगवू लागलो. सामन्यामागून सामने संपू लागले...आणि पराभवामागून पराभव मिळू लागले. त्यामुळं संघशक्ति म्हणतात ती कमी झाली आणि संघात बेदिली माजली. कुणाचा पायपोस कुणाच्या पायांत अशी परिस्थिती झाली. हळूहळू माझी पाळी आली. आणि तितक्यांत...ही "विचित्र व आत्मघातकी प्रथा" क्लबनं बंद केल्याची घोषणा झाली ! ही प्रथा क्लबला "आत्मघातकी" ठरल्याचं मला विशेष वाईट वाटलं नाही, पण ती मलाच "आत्मघातकी" ठरल्याबद्दल मात्र फार वाईट वाटलं ! बसच्या क्यू'त तासभर तिष्ठत उभं राहून एकदाची बस यावी आणि रांगेतल्या पुढल्या माणसाला घेऊन निघून जावी तशी माझी अवस्था झाली. खरोखरच माझी 'बस चुकली !' आतां दुसरा प्रयत्न.

मी माझा प्रचार पुन्हा जोरांत सुरु केला. कप्तान बदलण्याची मोहिम पुन्हां सुरू करावी अशीच 'मोहिम' मी पुन्हा सुरुं केली.

## अंपायरला खिशांत कसें घालावें ?



जॉर्ज पार नांवाच्या नॉटिंगहॅमशायरच्या खेळाडूनें तरुण खेळाडूंना अंपायरसंबंधी मजेशीर सल्ला दिला आहे. तो म्हणतो, "तुम्ही जेव्हां क्रिकेट खेळतां तेव्हां अंपायरकडे दुर्लक्ष करुं नका. पहिल्या प्रथम त्याच्या प्रकृतीविषयी आस्थेनें चौकशी करा, मग म्हणा, "तुमचे तिर्थरुप क्रिकेट काय उत्तम खेळत हो !" आणि शेवटीं त्याला कबुतरांची वा पांढऱ्या उंदरांची जोडी भेट द्या. ह्यामुळें तुमचा आत्मविश्वास इतका वाढेल कीं एरवी शून्यांत बाद होणारे तुम्ही शतक काढून जाल !"

भारतीय संघाचा दाखलाहि सर्वांच्या नजरेला आणून दिला. एकदा म्हणे भारतानं कसोटीमालिकेंत पांच सामन्यांसाठीं चार कप्तान नेमले होते आणि शिवाय प्रत्येक दौऱ्याला वेगळा कप्तान हे त्यांचं ब्रीद अजूनहि निष्ठेनं चालूच आहे ! हे मी तपशीलासगट लोकांना दाखवून दिलं. भारतीय संघासारखा श्रेष्ठ संघ जर अशा गोष्टी (म्हणजे चुका) करतो तर आपल्यासारख्या (य:कश्चित्) संघाला तशा (चुका) करायला काय हरकत आहे ? असा मी रोकडा सवाल सर्वांना केला ! मात्र हे दाखले माझ्या अंगाशीच आले. कारण 'यामुळें भारताचा काय फायदा झाला ?" असं मला विचारण्यांत आलं. त्याचं "यामुळें भारताचं काय नुकसान झालं?" असं प्रश्नरुपी उत्तर मी दिलं ! आणि लगेच एक जबाबवजा सवाल मी विचारला "याच पद्धतीमुळें शेवटी भारताला आज चांगला कप्तान सांपडलाच ना ?" त्यालाहि उलट उत्तर मिळालं, "भारताची पराभव-परंपरा संपली कां ?" अखेरीस मी निरुत्तर झालो. मागाहून मला एका फितूर खेळाडूकडून कळलं की कप्तान बदलण्याची कल्पना माझ्या डोक्यांतून निघाल्यानंच चिडून अधिकाऱ्यांनी ती प्रथा नेमकी माझ्या पाळीपाशीच थांबली होती !

पण एवढं झालं तरी माझे प्रयत्न थांबले म्हणता की काय ? मुळीच नाही. मी पवित्रा बदलला. कप्तान हा अंगापींडानं "इंप्रेसिव्ह" असावा त्याचं सर्वांवर वजन पडावं (विशेषत: पंचावर) वगैरे नवें दृष्टीकोन मी मंडळींना समजावून सांगू लागलो. नेत्याचा सगळ्या-वर वचक बसणं किती आवश्यक आहे आणि त्यासाठीं त्याची शरीर 'यष्टि' किती मजबूत व नजरेत भरणारी असावी हे ज्ञानामृत पाजतां पाजतां विधानाच्या पुष्टचर्थ, मी नेहमी उपयोगी पडणाऱ्या भारतीय क्रिकेटची उदाहरणं दिली. भारतीय क्रिकेट इतिहासांतील भानगडी आणि कप्तान हा एक रोमहर्षक भाग मी लोकांना कथन केला. कप्तान मनानं व शरिरानं कमजोर असला की त्याचे खेळाडू कसें बेजबाबदारपणें वागूं लागतात, मग कप्तानाच्या भानगडी कशा सुरुं होतात आणि शेवटी नदी सागराला मिळते तसा संघ पराभव-प्रत कसा गमन करतो, व त्यामुळें देशाचं नांव बद्दु कसं होतं हेहि मी विशद केलं. विझीचं नेतृत्त्व, अमरनाथाचं प्रकरण वगैरे कांहीं चलनी नाणी माझ्या पोतडीत होती. कप्तान तंदुरुस्तीनं भरदार असला म्हणजेच संघात शिस्त कशी बाणली जाते आणि मग संघ-भावना जागृत होऊन विजय कसा पदरांत पडतो वगैरे वगैरे हल्लीच्या टीकाकारांच्या तोंडून नेहमी नेहमी ऐकलेल्या गोष्टी मी नव्यानं फोडणी देऊन लोकांना ऐकवल्या. 'संघभावना जागृत होऊन विजय पदरांत पडल्याचा' मुद्दा स्पष्ट करतांना, दाखला म्हणून सांगायला, मजजवळ भारतीय क्रिकेटमधलं एकहि उदाहरण नव्हतं ! तरीहि माझ्या प्रभावी वक्तव्यामुळंच केवळ लोकांना माझं म्हणणं पटूं लागलं. खरं म्हणजे हा माझ्या भरदार (बाळसेदार) व्यक्तिमत्वाचाच परिणाम ! यावरून मी कप्तान व्हायला किती 'पात्र' आहे हे लोकांना वास्तविक कळायला पाहिजे होतं !

पण लोकांना बुद्धि असेल तर ना ? हल्ली लोकांत गुणग्राहकता कुठं आहे ? उपयुक्त वकिली डावपेचानंहि भागवण्यासारखं नाही

हे मला चटकन् दिसून आलं. चांगला फलंदाज जसा (पाय धडधाकट असतानाहि) 'रनर" घेतो तसा मी आणखी एक युक्तीवाद मदतीला घेतला. "जो कप्तान असतो तो गोलंदाज नसावा' अशी एक विचारसरणी टीकाकार नेहमी आपल्या "वाङमयांतून" सोयीस्कर रीत्या प्रतिपादित असतात ! गुलाम अहंमद सारखा गोलंदाज नेतृत्त्वांत अयशस्वी झाला कीं टीकाकार लोक ह्या विचारसरणीची तलवार म्यानांतून काढतात. परंतु बेनौसारखा उत्कृष्ट गोलंदाज कप्तान म्हणून उत्कृष्ट ठरला म्हणजे ही तलवार ते गुपचुपपणे म्यानांत टाकून देतात ! पण मला वरील उदाहरणाशी कर्तव्य नव्हते. तपशील अमान्य असला तरी तत्त्व मान्य होते. त्यामुळें कप्तान होण्यासाठीं मी हे तत्त्व वेठीस धरलें ! "गोलंदाज हा चांगला कप्तान होऊ शकत नाही" आणि याच्या उलट म्हणजे "जो गोलंदाज नसतो तो चांगला कप्तान होऊ शकतो" अशा सुधारून वाढवलेल्या सिद्धांतांची जोडगोळी मी मेंबरांच्या अंगावर सोडली ! माझी ही 'गोलंदाजी' परिणामकारक ठरणार असा सुरवांतीला रंग दिसत नव्हता. कारण आमच्या क्लबांत प्रत्येक जण गोलंदाज होता ! त्याला माझी विचारसरणी पटणं शक्य नव्हतं ! आमच्या क्लबांत 'ट्रुमन', 'स्टेथम,' 'डेव्हिडसन', 'हॉले वगैरे अनेक गोलंदाज होते. त्यामुळें या सगळ्या ट्रुमन कंपनीला माझं तत्त्व मंजूर होईल असं चिन्ह दिसेना. परंतु संघाचा कप्तान हा जर गोलंदाज असला, निदान स्वतःला तसं समजत असला, की संघाचे किती हाल होतात हे आस्ते आस्ते त्यांचं त्यांनाच कळू लागलं. खऱ्याखुऱ्या गोलंदाजाला मिळालेली षट्क संख्या आणि कप्तानानं टाकलेली षटक् संख्या यातील वाढत जाणारी तफावत हळूहळु जेव्हा प्रत्येकाला जाणवूं लागली तेव्हा त्यांना माझ्या सिद्धांताचं महत्त्व पटू लागलं ! "जो गोलंदाज नसतो तो कप्तान होतो !" हे तत्त्व सगळयांना पटूं लागल्याची मला जेव्हा खात्री झाली त्याच वेळेला मनावर कमालीचा संयम ठेवून मी सठीसामासी मिळणारी गोलंदाजीहि नाकारूं लागलो ! मी चांगला गोलंदाज नाही याबद्दल कोणाचंच दुमत नव्हतं. पण मी गोलंदाजच नाही हे सिद्ध करण्यासाठीं मी चेंडू हातात घ्यायचाच नाही असं ठरवून टाकलं ! यामुळें माझ्या हातून क्षेत्ररक्षणांत बऱ्याच चुका घडल्या. चेंडूला स्पर्श करायचा नसल्यानं अनेक झेल सुटलें. पण मला त्याबद्दल मुळीच खेद झाला नाही. उलट मी गोलंदाज नाही हे त्यामुळें आपोआपच सिद्ध झालं ! चेंडूला न शिवणारा आणि गोलंदाजीचा उपवास करणारा हा सिद्धपुरुष कप्तान होण्यास निश्चित लायक आहे हे थोड्याच दिवसांत सिद्ध झालं ! इतर खेळाडूंना चेंडू संबंधीचा कोणताच संयम पाळता न आल्यानं माझं आयतंच फावलं ! गोलंदाजी न करणारा क्लबांत मी एकटाच 'मेंबर' आहे असं दिसून आल्यावर माझे नेतृत्त्वावरील 'क्लेम्स' वाढूं लागले !

आणि अखेरीला माझ्या सिद्धांताची सरशी झाली. तत्त्वाचा विजय असो ! माझं म्हणणं सर्वांच्या मनावर पूर्णपणे बिंबलं आणि सर्वांनी मला एकमतानं कप्तान होण्यासाठीं विनवलं ! माझ्या भरदार व्यक्तिमत्त्वाचं 'इंप' सर्वांवर पडलं होतं हे आता सूर्यप्रकाशाइतकं स्पष्ट झालं ! माझ्यासारखा कधींहि स्वतःकडे गोलंदाजी न घेणारा आणि शेवटच्या क्रमांकावर खेळायला जाणारा फलंदाज, कप्तान झाल्यास निःपक्षपातीपणानं आणि निस्वार्थीवृत्तीनं वागेल ही ज्याला त्याला खात्री पटली होती.

शेवटी माझं स्वप्न साकार होण्याचा तो सुदिन उगवला. आणि मी कप्तान झालो. लागोपाठच्या तब्बल पांच सामन्यांतून मी नेतृत्त्वाची सूत्रं आणि वस्त्रं सांभाळली. (वस्त्रं म्हणण्याचं कारण असं की नेता झाल्यावर माझा पोषाख बदलला. तो खास करून लोकांचं लक्ष वेधून घेईल असा अघळपघळ होता. त्यामुळें मला कप्तानपदाची जबाबदारी सांवरता सांवरता पोषाखहि प्रत्येक वेळीं सांवरावा लागे !) पांच सामन्यांत कर्णधारपद 'गाजवून' मी जणू कांहीं एका टेस्टमालिकेचंच धुरीणत्व पत्करलं आणि "पार पाडलं !' शेवटी माझ्या टेस्टमालिकेचा निकाल येणें प्रमाणें लागला–

एकूण सामने–पांच; अनिर्णित—शून्य;
विजय – शून्य; पराभव – पांच.

व्यापक दृष्टिकोनांतून बघितल्यास किंवा भारतीय क्रिकेटचा इतिहास लक्षांत घेऊन पाहिल्यास हा 'अनुभव' कांहीं तितका लांच्छनास्पद नाही असंच माझं मत आहे ! आपल्या पराक्रमाचं यथार्थ मोजमाप करण्यासाठीं इतिहासाशी नेहमी तुलना करावी असं जे इतिहासकार सांगतात ते कांहीं खोटं नाही !

•••





# त्रिफळा अंपायरचा !!!

—दि. श्री. कराडकर

'कुठल्याहि परिस्थितींत अरसिक माणसाला कवित्व निवेदन करायला मला लावूं नकोस' अशी कळकळीची विनंति कालिदासानें परमेश्वराला केली आहे. कालिदासाच्या काळीं क्रिकेट नसलं तरी क्रिडा होत्या आणि क्रिडा म्हटली की अंपायर आलाच. कालिदासाने ह्या अंपायरला पाह्यलं असावं आणि त्याला अरसिक माणसाची कल्पना सुचली असावी; म्हणूनच परमेश्वररूपी अंपायरजवळ त्यानें वरील प्रमाणें 'अपील' केलेलं आहे !

अंपायर सारखा अरसिक माणूस शोधून मिळणं कठीण. त्याच्या चेहऱ्यावरील भाव कधी हेलावत नाहींत, ओठांची हालचाल जेवणापूर्ती काय जी होत असेल तितकीच, फारतर बायकोचं किंवा प्रेयसीचं (हो, अशाच माणसांना प्रेयसी लाभते. दुर्दैव !) अधरामृत चाखतांना. ह्याच्या गालावर खळी कधींच पडत नाही. थोडक्यांत म्हणजे इकडे सगळे लोक हास्यकल्लोळांत मशगूल झाले असतांना हा मात्र कोणाला तरी 'पोंचवून' आला आहे, इतका चेहऱ्याने मख्ख ! बरं हा 'किंचित् कवि' सारखा 'किंचित् रसिक' म्हणावा तर तसाहि नाही. गोलंदाजाने 'हॅट्रिक' घेतली तरी हा टाळ्या पिटीत नाही, कुणी शतक काढलें तर कौतुकाऐवजीं 'ही पिडा केव्हां जाईल' ह्याच विचारानें ह्याच्या मनांत शतक झळकावलें असणार; ठीक आहे, एखाद्याला कौतुक करण्याचं अंग नसतं पण दुसरें कौतुक करीत असलेलेंहि ह्याला पाहवत नाही; शतकवीरांना हार घालायला येणाऱ्यांना तो एकदम 'चले जाव' चा आदेश देतो !

इतकं असूनहि क्रिडांगणावर मानाचं पान हाच पटकावतो. क्रिकेट सुरुं झालं कीं प्रथम दर्शन देतो तों हा प्राणी— संथ पावलांनीं विकेट कडें चालत असलेला ! बरोबर दुसरा असतो. दोघांच्याहि पावलांची चाल कधींच चुकत नाही. दोघे चालतांना बोलतहि नाहीत. बोललें तर बोलतांना हातवारे असें करतात कीं लांवून एखाद्याला वेडे वाटावेत! आणि हातवारे न करीत ते बोलत असलें तर ते बोलताहेत असं वाटत नाही. संथ पावलांनीं विकेटजवळ गेल्यावर आपआपल्या जागेवर ते उभें राहतात आणि तसें उभें राहिल्यावर शेतांतलं बुजगावणं आणि त्यांच्यांत कांहीं फरक नसतो, म्हणूनच क्रिकेट चालू असतांना कावळे वगैरे पक्ष्यांचा त्रास नसतो पहा ! विकेट जवळ गेल्यावर जॉमेट्रिच्या प्रोफेसरला शोभेल असं ते वागतात. दोन स्टंप्स्मधील अंतर काय मोजतील, पावलांच्या पट्टीने विकेट काय मोजतील, नंतर स्टंप्स्मधून डोकावून एकमेकांना बघतील— असतं निमित्त डोळा मारण्याचं पण हे असं आड वळणांनी. स्त्रिया अंपायर होत नाहीत ह्याचं प्रमुख कारण हे असावं ! इतकं सगळं झाल्यावर पिचची तपासणी करण्यासाठीं एकमेकांकडे चेंडू टाकतील. कांहीं अंपायर मात्र हा प्रयोग करीत नाहींत कारण उभ्या जन्मांत ते क्रिकेट कधीं खेळलेलें नसतात !

अशारीतीने मानाचं पान पटकावून झाल्यावर तें दोघेहि क्षेत्ररक्षण करायला निघालेल्या संघाकडें अशा म्हारक्या नजरेनें बघतात कीं तशी नजर कधींहि कोणी कोणावर रोखूं नयें.

'काळ्या कपिलेचं दूध कोणी काढलं ?' तर 'रामानें'. लहान मुलं ह्या प्रश्नाचं ज्या तत्परतेने उत्तर देतात त्याच तत्परतेने 'क्रिकेटचा कायदा कोण पाळतो ?' ह्या प्रश्नाचं उत्तर द्यायचं झालं तर 'अंपायर, असं देतां येईल. स्वतः तर पाळतोच पण इतरांनांहि पाळावयाला लावतो ! त्याच्या मनांत येईल तर भरला डाव उधळूं शकतो. मन चाहेल तेव्हां सामना सुरुं करुं शकेल, मन चाहेल तेव्हां बंद करुं शकेल. अंपायर जितका चांगला तितका सामना रंगतो आणि तो जितका वाईट तितका सामन्याला बेरंग चढतो. इतकं ह्या अंपायरचं महत्व असूनहि आपण द्यावं तितकं महत्व अंपायरला देत नाही. क्रिडांगणावरचं त्याचं अस्तित्व आपण कांहीं कांहीं वेळां विसरतो. तो जेव्हां एखादी चूक करतो तेव्हांच तो आपल्या लक्षांत येतो. एखाद्याला खोटा बाद दिला कीं त्याला माणसांतून उठवला जातो, चाराच्या ऐवजी दोन धांवा दिल्या कीं तो चिकी खाऊ ठरतो ! ओव्हर मोजा-

*गोलंदाज त्रिफळा उडवतो तो फलंदाजांचा, अंपायरचा नाहीं,*
*पण प्रेक्षक असे विलंदर असतात कीं ते टपलेले असतात*
*नेमका अंपायरचा त्रिफळा उडवायला ........*

यला तो चुकला कीं लगेच 'खडे वदल' चा गजर सुरुं होतो. पण तो जेव्हां अचूक कामगिरी (म्हणजे प्रेक्षकांच्या पसंतीला उतरतें तीं) वजावतो तेव्हां मात्र कौतुकाचा एकहि शव्द त्याच्यावर उधळला जात नाही. एकंदरींत क्रिकेटचा अंपायर हा भाजीतल्या मिठासारखा आहे. भाजीत मीठ नसेल तर ती अळणी लागते काय ? किंवा जास्त असेल तर खारट काय ? पण बेतंबात असल्यावर मिठाचं कौतुक नाहीं !

परंतु कोणी निंदो, कोणी वंदो अंपायर ही क्रिकेट मैदानावरील एक ज्येष्ठ आसामी आहे हे सत्य विसरुन चालणार नाही. अगदीं वसच्या कंडक्टरसारखा ! कंडक्टर नसेल तर वस चालत नाही. महत्व आहे ते तो वाजवतो त्या घंटीला. घंटीचा विवक्षित आवाज झाल्याशिवाय ड्रायव्हर 'व्हिल' वरुन हात फिरवीत नाही ! ज्येष्ठ असल्या-मुळेंच कीं काय मैदानावर सगळेजण शिव्या अंपायरला देतात. तोहि मुकाटयानें त्या खातो. प्रेक्षकहि कांहीं कमी नाहींत. क्षेत्र-रक्षकानें झेल सोडला तर 'Hard Luck !' म्हणून सोडून द्यायचं पण अंपायर चुकला तर 'हकाल देव' चा पुकार होतो. असा हा लांब पांढऱ्या डगल्यांतला इसम आहे ! फलंदाज 'फुल टॉस'ला चकल्यावर त्याचा बळी गेला कीं आपण 'च् च् च्' म्हणून विनाकारण हळहळतो. फार तर 'कसा गाढवासारखा खेळला' म्हणून म्हणतो पण अंपायरनें अगदीं तसूंभर चूक केली कीं तो मात्र गाढवांचा राजा ठरतो !

वास्तविक पाहतां घाणीला जुंपलेल्या बैलासारखा तो दिवसभर क्रिडांगणावर रावत असतो. प्रत्येक फेकलेला चेंडू (आणि प्रेक्षकांनीं फेकलेल्या गंडेऱ्याहि) तो नजरे-खालून घालत असतो. तसा त्याला तो घालावाच लागतो. मानेवर एक प्रकारचं जोखड वाळगून तो वावरत असतो. खेळा-डूंनीं क्रिडांगणावर खुशाल मजा करावी. कांहींजण तर क्षेत्ररक्षण करतांना झोपा काढतात, जाग येते ती त्यांच्याकडे झेल येतो तेव्हां, आणि म्हणूनच तो नेमका सुटतो ! प्रेक्षकांच्या नजरेंतून इथें हे Bad Luck ठरतं पण अंपायरनें मात्र झोपेंत निर्णय दिला तर त्याची झोप कायमची उडविली जाते !

सबंध दिवस सामना डोळयांत तेल घालून वघणारा ह्याच्यासारखा दुसरा प्रेक्षक नाही. नाहींतरी प्रेक्षक सामना वघायला आलेले नसतातच. 'ट्रॅन्झिस्टर' वर सामना ऐकायला ते आलेले असतात ! ऐकायचा कंटाळा आला कीं गंडेरीवाल्याच्या टोपल्या उधळ-ण्याचा विधायक कार्यक्रम हाती घेतला जातो. म्हणजे एकूण प्रेक्षक हा असा ! पण अंपायर असा नाही. जितका कर्तव्य-दक्ष तितकाच जागरुक ! पाऊस पडल्यावर प्रेक्षक 'ट्रॅन्झिस्टर' वर फिल्मी गाणी ऐक-ण्यांत दंग होतात तर खेळाडू 'आज तरी आतां सामना होत नाहीं' ह्या सुखद कल्पने-वर निर्वास्त राहून मुर्गी झोडण्यांत मश्गुल झालेले असतात, पण ख्रात पीत नाहीं तो हा अंपायर ! तो एकटक नजरेनें पावसाकडे वघत असतो. नजरेंत भाव असतो पाऊस कवीं एकदांचा थांवतो ह्याचा. दोन्ही संघाच्या कप्तानांनीं जाहीर केलं कीं आतां खेळ पुढें होत नाहीं तेव्हां तो सुटकेचा श्वास सोडतो ! शरीरावरचा पायघोळ झगा काढला जातो तो तेव्हां, शरीरावरचा घाम पुसला जातो तो तेव्हां, पाणी पिण्याचं भान येतं ते आतां !! त्याची ही सहन-शीलता केव्हांहि अजिंक्य आहे.

मघांशीं म्हटल्याप्रमाणें अंपायर म्हणजे सामन्यांतील केवढी वडी आसामी परंतु आपण त्याच्याकडें विदूषक म्हणून पाहतों. म्हणजे स्टेडियमवर चालणाऱ्या विदूषकी चाळ्यांनां तो पायबंद घालण्याचा प्रयत्न करतो म्हणून त्यालाच विदूषक ठरवायचा ही वृत्ती ! मग 'प्रसंगीत चिडवीत जावें' म्हणून आपण प्रत्येक प्रसंगाची वाट पहात असतो. लेगकडे फलंदाज चेंडू मारायला चुकला, पण चुकून त्या फट-क्यानें अंपायरची पाठ शेकली गेली कीं प्रेक्षा-गारांतून त्या अंपायरची टवाळी सुरुं झालीच ! जो तो अंपायरला शिव्या देतो. वादाची खुम-खुमी असलेला मराठी माणूसहि, 'उसका



छे, छे ! कांहीं झालं तरी तो आपला 'निकाल' बदलणार नाहीं.

मिस्ट्रिक है,उसने वाजु नको व्हायला.पाठ शेकेगा नाही तों क्या होगा ?' असा 'मराठी हिंदी का' बाण अंपायरवर सोडतो. नुसता जल्लोष ! त्या जल्लोषांत आसूरी आनंद दडलेला असतो. विनाकारण ! वाऱ्यानें अंपायरची हॅट उडविली गेली कीं पुन्हां आरडाओरडा ! तो धांवतां धम्वतां घसरला कीं टाळयांचा गजर ! तो व्यवस्थित चालूं लागला तरीसुद्धां Left-Right चा तर्जुमा ! त्याची प्रत्येक हालचाल विदुषकी ठरविली जाते ती ही अशी !

गोलंदाजाचं लक्ष्य फलंदाज असतो तर प्रेक्षकाचं लक्ष्य अंपायर असतो ! कां कोणास ठाऊक ? तो म्हणें कधीं कधीं (कधीं कधींच हं) चुकीचे निर्णय देतो. देत असेल ! माणूस म्हटला म्हणजे चूक करणारच. पण अंपायरला प्रेक्षक माणूस मानायला तयार नसतो, त्याला कोण काय करणार ?

एक अंपायर हुशार होता. एका सामन्याच्या वेळीं घडलेली गोष्ट. कोणीतरी ओरडलं–' How's that ? अंपायरनें शांतपणें 'अपील करणाऱ्याला विचारलं,–"Wait a minute, who did it ?"

कधीं कधीं अभावितपणें नर्मविनोदहि तो करुन जातो. मुंवईत सामना चालूं असतांना एका इंग्लिश खेळाडूने अंपायरला 'आपला व्यवसाय काय ?' म्हणून विचारले असतां, तो अंपायर ताडकन् उत्तरला— "I am typewriter in Railway." Typist ला हा कांहींतरी खास ' भारत में वना हुआ ' असा नवीन शव्द असेल असा ग्रह करुन तो खेळाडूं गप्प वसला.

दिलाने हा प्राणी सच्चा. कुठलंहि काम करण्याची ह्याची तयारी असतें. म्हणूनच खेळाडूंच्या टोप्या, स्वेटर्स, रुमाल, वटणं हा सगळा माल तो सांभाळीत असतो. पुन्हां दक्षता घऊन ज्याची टोपी त्यालाच घालतो ! (देतो) अंपायरचं घड्याळ हे असंच एक कुतूहलाचा विषय होणारं ठरतं ! त्याचं घड्याळ कधींच कोणाशी जुळत नाही. सामना सुरुं होतो तो स्टेडिअमवरील घड्याळानुसार नाही तर अंपायरच्या मनगटावरील घड्याळानुसार. 'लंच' च्या वेळेची त्याची मखलाशी अशींच. प्रेक्षकांचं लक्ष हॉटेलमध्यें जागा मिळविण्यांकडे गुंतलेलं असतं, खेळाडू दमलेले असतात पण अंपायरची एक ओव्हर असतेंच ! संध्याकाळीं प्रेक्षक गाडी पकडण्यासाठीं 'आतां शेवटचीच ओव्हर असेल' म्हणून उठतो पण ती ओव्हर झाल्यावरहि अंपायर 'वेल्स्' काढायला तयार नसतो. अंपायरचा वरचढपणा प्रेक्षक इथें नाखुषीनें मान्य करतो ! 'अपील' नाही ! !

एकदां काय झालं एका खेड्यांत दोन संघांचा सामना होणार होता. सामना सुरुं होण्यापूर्वी एक वृद्ध माणूस 'विकेट' पाहायला आला. त्याने एका कप्तानाला विचारलें,

"तुझा संघ गोलंदाजीत मजवूत आहे नां ?"

"तितका कांहीं वाईट नाहीं." उत्तर आलें

"जास्त बळी घेणारा तुमचा तुफान गोलंदाज कोण आहे ?"

"तसं कांहीं सांगतां येणार नाही"–अंपायर.

"मग मी सांगतों."

"अं ? कोण आहे ?"

"अरे, अंपायर !" म्हातारा खळखळून हंसला. म्हताऱ्याचा युक्तिवाद अगदीं पटणारा आहे. सामन्यांतलें सगळें बळी अंपायरच घेतो. अंपायरनें हात वर केल्याशिवाय फलंदाजाच्या वाद होण्याला शिक्कामोर्तब होत नसतं ! म्हणजे शवटीं फलंदाज बाद झाला कीं नाहीं हे ठरवतो कोण ? अंपायर ! गोलंदाज फक्त निमित्तमात्र !

एकंदरीत विनोदाचं अंपायरला वावडंच ! कसोटी सामन्यांतील त्याचं गांभीर्य तर निवृत्त न्यायाधिशाच्या चेहऱ्यावरील गांभीर्यालाहि लाजवतं ! तो डोळयांत तेल घालून (वास्तव अर्थानें काजळ) पहारा करीत असतो कारण त्याला ठाऊक असतं कीं आपली लहानशी चूक आपल्याला कसोटी सामन्यांतून फलंदाजाच्या आधीं बाद करील ! अशावेळीं अंपायरला सहकार्य देणं प्रत्येकाचं कर्तव्य आहे. प्रेक्षकांच्या घाईगर्दीला व खेळाडूंच्या 'अपीला'च्या आरडाओरडीला तो बळी पडतो. अंपायर म्हणजे पार्श्वसंगीत वाजविणारा वादक आहे. गायकाच्या गायनाला जितकं महत्व असतं तितकंच महत्व वादक संगीत वाजवितो त्या संगीताला असतं !

अंपायरच्या भोंवती क्षेत्ररक्षक 'अपील' करतांना जो गिल्ला करतात तेव्हां अंपायरची होणारी हालचाल ही पहाण्यासारखी असतें. त्याला त्यावेळचा अभिनय हा एकपात्री अभिनय ठरतो. अंपायर वहिरा असेल तर प्रश्नच मिटला. असा गिल्ला झाला कीं एक अंपायर मान वर आकाशाकडें करी— 'त्या जगन्नियंत्याला विचारा.' असा भाव ! हाच अंपायर L.B.W. चं अपील केलं असतांना खाली सरकलेला आपल्या पायांतला मोजा वर ओढण्यांत दंग होई !

दुसरा एक अंपायर कंबरेंतून वांकून सबंध दिवस 'अंपायरींग' करीत असें. सवंध दिवस त्याला त्याच अवस्थेंत वघितल्यानंतर घरी जातांना मला उगाच भास होई—मला 'लंबॅगो' झालाय् कीं काय ? ●●●

## अरे पण स्कोअर काय ?

मुंवईला भारत व पाकचा पहिला कसोटी सामना चालूं असतानांची गोष्ट. एका कचेरींत जवळजवळ शुकशुकाट झाला होता. ऑफिसच्या साहेवाला एका कारकूनाची गरज लागली. त्यांनी वोलावणें पाठविलें तेव्हां हा कारकून धावांचा आंकडा ऐकावयास गेल्याचें कळलें. तेव्हां साहेवांचा पारा एकदम वर चढला !

तो कारकून ऑफिसांत येतांच साहेवांची त्याच्यावर सरवत्ती सुरूं झाली. वेजबाबदार वगैरे विशेषणांची खैरात साहेवांनी त्याच्यावर केली, आणि त्याच्याकडून झाल्या प्रकारावद्दल माफीपत्र मागितलें. कारकूनाचा नाइलाज जाला व त्याने साहेवांना पत्र लिहून दिले. तें साहेवांच्या हातांत ठेवून आपल्या टेबलाकडे जाण्यासाठीं वळणार एवढयांत साहेवांचे शब्द त्याच्या कानीं पडले," अरे, परंतु शेवटी स्कोअर काय झालाय ?"

*१९६१ मध्यें इंग्लंड वि. वेस्ट इंडिज व १९६२-६३ साली ऑस्ट्रेलिया वि. इंग्लंड या टेस्ट मालिकेंतील अटतटीचे हे सामने गाजले खरें. परंतु १९०२ सालीं खेळला गेलेला हा सामना कांहीं औरच होता. त्याच रोमहर्षक व चित्तथरारक सामन्याची तेवढीच जिवंत प्रचिति घडविणारा हा लेख....*

# गनिमी पवित्र्याचा जेसप

—मधुकर कोसारे

**ऑस्ट्रेलिया** आणि इंग्लंड यांच्या मध्यें १९६२–६३ सालीं खेळण्यांत आलेला पांचवा टेस्ट क्रिकेटचा अत्यंत अटितटीचा आणि चुरशीचा सामना खेदजनक रितीनें अनिर्णित राहिला. तेव्हा त्यानंतर असे सुचविण्यांत आले कीं त्यांतून निर्माण झालेली कटुतेची राख सागरांत विसर्जित करावी म्हणजे टेस्ट क्रिकेट यथार्थ स्वरुपाने खेळता येईल.

कोणी ह्या मताशी सहमत असो वा नसो, परंतु एवढें मात्र खरें कीं अत्यंत चुरशीचा आणि नाटयपूर्ण असा क्रिकेटचा कसोटी सामना ऑस्ट्रेलिया आणि इंग्लंड यांचे मध्यें खेळला गेला. त्यावेळीं त्यांच्यांत कोणतीहि कटुतेची भावना दिसून आली नाही. दोन्ही बाजूकडील चमू विजय मिळविण्यासाठीं अगदी हिरिरीने नि चुरशीने खेळण्यास पूर्ण सिद्ध होत्या.

अशा प्रकारचा पांचवा क्रिकेटचा कसोटी सामना ओव्हल येथें १९०२ च्या ऑगस्ट मध्यें खेळला गेला. हा सामना होण्यापूर्वी आस्ट्रेलियाने पांचदा अजिक्यपद मिळविलें होते. त्यापैकीं दोन सामने अनिर्णित व दोन जिंकले होते. ऑस्ट्रेलियाशी झालेल्या मागील एकंदर १९ टेस्ट क्रिकेट सामन्यापैकी इंग्लंडने फक्त २ सामन्यांत विजय मिळविला होता. परंतु अगदी अलिकडील सामना केवळ ३ धावांनी हरावा लागला होता. अखेरीस इंग्लंड आता तरी विजय प्राप्त करूं शकेल काय ? असा प्रश्न होताच.

नेहमी प्रमाणें असणारे त्या ऋतुंतील हवामान ऑस्ट्रलियनांना मानवणारे असेच होते. आपल्या पहिल्या डावांत त्यांनी ३२४ धावा काढल्यानंतर, त्या रात्री चांगलीच जोराची पर्जन्यवृष्टि झाली आणि दुसरे दिवशीं पावसाने ओलेचिंब झालेल्या मैदानावर इंग्लंडला खेळास ( फलंदाजीला ) सुरवांत करावी लागली. वस्तुतः पावसाने भिजलेलें खेळाचें मैदान ऑस्ट्रेलियाचे खेळाडू ट्रम्बल व सॉन्डर्स यांना उपकारक असेच होते.

इंग्लंडने मोठया जिकरीने पहिल्या डावांत फक्त १८३ धावा केल्या. ऑस्ट्रेलियनांना सुद्धा तोच अनुभव घ्यावा लागला, आणि दुसऱ्या डावांत त्यांच्या एकूण १२१ धावा झाल्या. तरिसुद्धा दोन्ही डावांच्या धावा मिळून इंग्लंडच्या धावा पेक्षां ऑस्ट्रेलियनांच्या २६२ धावा अधिक होत्या. क्रिकेटचे मैदान पावसाने खराब झालेले असूनहि ऑस्ट्रेलियाच्या इतक्या अधिक धावा झालेल्या पाहून त्यांच्या गळयांत विजयश्रीने माळ घालण्यास त्या पुरेशा आहेत, असेच वाटत होते.

जेव्हा ऑस्ट्रेलियन डावखुरा गोलन्दाज सॉन्डर्स यांनी फक्त २ धावावरतीच कॅप्टन ऑर्चि मॅकलारेन आणि जॉनी टिल्डस्ले यांचा त्रिफळा उडवून बळी घेतला, तेव्हा ऑस्ट्रेलियाचा विजय निश्चित झाल्यासारखेच दिसत होते. तिसऱ्या ओव्हरमध्यें सॉन्डर्सनी पुन्हा लिओनेल पॉलारीट यांचा त्रिफळा उडवून बळी घेतला. यावेळीं इंग्लंडचे ३ गडी बाद १० धावा झालेल्या होत्या. जर का सिडने ग्रेगरीने शॉर्ट-लेग वर टॉम हेवर्ड यांनी मारलेला झेल चुकवला नसतां, तर इंग्लंडचे फक्त १६ धावावर चार गडी बाद झालेलें असतें. परंतु आतां त्या उलट, पावसाची रिमझिम सुरूं होऊन त्यामुळें अर्धा तास खेळाचा खोळंबा होण्याचें वेळे पावेतो, एफ्. एस्. जॅकसन आणि हेवर्ड यांनी आपल्या धावांची संख्या २८ पर्यंत नेली. परंतु हेवर्ड यांनी आणखी ३ धावा काढल्या नि त्याचा झेल पकडला जाऊन त्याला बाद व्हावें लागलें. सॉन्डर्सला १५ धावांत ४ गडी बाद करण्याचें श्रेय मिळालें. त्यानंतर लेन ब्रॉन्ड सुद्धा लगेच विकेट-ऑफवर ह्युग ट्रम्बल यांनी झेल पकडल्यामुळें बाद झाला.

## जेसपचा प्रवेश

इंग्लंडचे निम्मे खेळाडू ४८ धावा काढून जेव्हा गारद झाले, तेव्हा त्यांना आपल्या धावा भरून काढून विजय मिळविण्यास अवघ्या २१५ धावांची आवश्यकता होती.

आता जॅकसनच्या जोडीला ठेंगणी व खंबीर अशी गिलबर्ट लॉयर्ड जेसपची मुर्ती खेळावयास आली. "गनिम" जेसप यांनी दोन्ही पाय वांकलेले, डोळे त्रिफळयाच्या किंचित वर असलेले असा आपला सुपरिचित पवित्रा घेतला. लव-

करच सामन्याचा रागरंग वदलला जाऊन तो नेहमी करिता चित्तथरारक कसोटी सामना ठरला. १३, ऑगस्टच्या त्या बुधवारच्या सकाळीं ४००० लोकांच्या जनसमुदयाने आपल्या आवडत्या जेसपच्या आगमनाचे सहर्ष स्वागत केले. आणि त्यांनी जेव्हा घोका पत्करून फलन्दाजीला सुरवांत केली, तेव्हा कसोटी सामन्यांच्या इतिहासांतील फार मोठा डाव त्यांना आज पहावयास मिळेल अशी कोणीहि कल्पनाच केली नसेल.

परिस्थिति जरी नाजुक होती, तरी जेसपने अगदी आपल्या स्वभावास अनुसरून धैर्याने अेक ट्रम्वलच्या व दुसरा सॉडर्सच्या वाजूने असे दोन मोठे टोले हाणले. परंतु त्यामानाने ही असमाधानकारक अशी सुरवांत होती. त्यामुळें २२ धावावर त्यांचा त्रिफळा उडता उडता वचावला. आणि ५ धावा नंतर तर त्यांनीं हाणलेल्या चेंडूचा झेल अवघड गेल्यामुळें त्यांना जिवदान मिळाले. परंतु मध्यंतरापर्यंत जेसप आणि जॅकसन मिळून ५ वाद ८७ धावा झालेल्या होत्या. जॅकसनच्या नावाद ३९ धावा, जेसपच्या २९ धावा होत्या. आतां इंग्लंडला विजया करितां १७६ धावांची गरज होती.

मध्यन्तरानंतर दोघाहि खेळाडूंनी भूमिका वदलली. जॅकसन त्यानंतर आत्मनिश्चयाने फलंदाजी करित नव्हता त्यामुळें जेसपने पूर्ण प्रभुत्व घेतले होते. 'गनिम' जेसप आतां तर चवताळलेल्या अवस्थेत तितक्याच निष्ठुर व तरवेजपणे ऑस्ट्रेलियाच्या गोलन्दाजीचा धुव्वा उडवित होता. असा पूर्वी कधीहि कसोटी सामन्यांत पहाण्यांत आला नव्हता.

### दमदार धावाची भर

जेसपने सॉन्डर्सची गोलंदाजी लागोपाठ पिटाळून धडाधडा ४ चौकार मारले व अेक धाव काढली. परंतु ही कांहीं अंधाधुंद टोलेवाजी नव्हती. तो पिटाळण्यासाठी योग्य चेंडूची चाणाक्षपणें निवड करी आणि निष्णांत संधानाने आणि दिशेने त्यांना हाकीत असे. मध्यंतरा नंतर जॅकसनने फक्त १० धावा काढल्या आणि त्याच्या अर्ध्यशतकाला अेक धाव कमी असतानांच सुटसुटीत ट्रम्वलने गोलंदाजी करून त्याचा झेल पकडला. जेसप वरोवरच्या त्याच्या भागिताराने ६५ मिनिटांत १०९ धावांची भर घातली (८३ जेसपच्या).

जॉर्ज हर्स्ट जोडीला आल्यावर, जेसप चित्तथरारक गतिने धावांची भर घालू लागला. ट्रम्वलने गोलंदाजी केलेले चेंडू जेसपने दोनदां तंवूकडे (पॅव्हिलियन) हाणले आणि आर्मस्ट्रॉंग लांव असल्यामुळें त्यांनी आपले शतक पूर्ण केले. त्यानंतर जेसप यांनी फक्त ४ धावांची भर घातली आणि शॉर्ट-लेगला त्यांनी मारलेला झेल पकडला. त्या दिवशीं तो खेळला ते कांहीं औरच रंगतदार टोले होते. आणि ते त्याच्या ऐतिहासिक डावांची पराकाष्ठा दर्शवित होते. तंवूकडे परततांना जेसपचे पावलागणिक सहर्ष कौतुक होत होते. त्यांनी आपल्या सव्वा तासाच्या डावांत अेकूण १३९ धावा पैकीं १०४ धावा काढल्या. त्यांत अेक पंचक, १७ चौकार, २ त्रिकार, ४ दुकार आणि फक्त १७ अेकेरी धांवा आहेत.

### अरे, पण विजय कोणाचा...?

अशाप्रकारे पांचव्या कसोटी सामन्याचा पूर्णतः रागरंगच वदलला. इंग्लंडच्या ७ वाद १८७ धावा होत्या आणि विजयाकरितां त्यांना ७६ धावांची आणखी गरज होती. जेथें सामना निश्चित हारणार अशी ती एक वेळ होती तेथें आतां कांहींतरी विजयाची आशा दिसत होती. जणूं काय एका मोठ्या डावांच्या पात्रतेचा दुसराहि असावा, अशा थाटांत अष्टपैलू हर्स्ट आतां वाणेदारपणाने फलन्दाजी करण्यास सरसावला. सॉन्डर्सच्या वाजूने दोन चौकार मारून त्यानें २०० वर धावा नेल्या.

इंग्लंडच्या एकूण २१४ धावावर वील लॉकवूड वाद झाला. परंतु त्यानंतर हर्स्टला यष्टीरक्षक डिक लिलेचा चांगलाच साथ मिळाला आणि धिमेधिमे धावांचा आंकडा २४८ पर्यंत गेला. आतां फक्त १५ धावांची अवश्यकता होती. इंग्लंडच्या विजयाची शक्यता स्पष्ट झाली. अरेरे ! त्याच वेळीं लिले १६ धावावर वाद झाला. आणि शेवटचा गडी क्रिडांगणवर यावयाचा अुरला असतांना जी परिस्थिति निर्माण झाली तशीच चौथ्या कसोटी सामन्यांत त्याच अवस्थेमध्यें निर्माण झाली होती. त्यावेळीं शेवटचा गडी येतांना इंग्लंडचा विजय होण्यास ८ धावांची गरज होती– जे कार्य आवाक्या वाहेरचें सिद्ध झालें होते.

### ऐतिहासिक उद्गार

ह्या वेळेला इंग्लंडला १५ धावांची गरज होती. परंतु ज्या जॉर्ज हर्स्ट आणि विलफ्रेड ऱ्होडेस् यांच्या अुत्कृष्ट साथीदारीने ह्या आव्हानाचा मुकावला केला, त्या दोघांनाहि पूर्वीच्या कसोटी सामन्या करितां निवडकरणारांनी मूर्खपणाने रद्द केले होते.

हर्स्ट क्रिडांगणावरून यॉर्कशायरच्या आपल्या सोवत्यास भेटण्यास सामोरा गेला आणि त्याचे सद्याच्या अैतिहासिक उद्गारांनी स्वागत केले, "तूं काळजी करू नकोस, विलफ्रेड, आपण अेक अेक करून भरून काढूं." हर्स्ट क्रमाने ११ वा फलंदाज असल्याकारणाने प्रयत्नपूर्वक गोलंदाजीचा मुकावला करित हुशारीने प्रत्येक ओव्हरमध्यें तो अेक धाव काढूं लागला.

ऱ्होडेसने स्लिप्स मध्यें मारून मिळालेल्या भाग्यशाली चार धावांनी खेळास सुरवांत केली, आणि अेकदां तर त्याने धोका होण्यासारखा चेंडू वर मारला जो स्लिप्सच्या जवळच असलेल्या आर्मस्ट्रॉंगला स्पर्श करून गेला वाकी कांहीं नाही. एरव्हीं त्याने कोणताहि



गंप्या, चल कर बोलिंग, स्टंप्स् आयतेच........आहेत !

धोका पत्करला नाही आणि धिमे धिमे धावा निघूं लागल्या. विजयाकरितां ५ धावांची आवश्यकता असतांना अेक धाव काढण्यासाठीं टोला हाणला, तेव्हां चेंडू जोरांत परत फेंकल्या-मुळें त्याला अेका अैवजीं दोन धावा मिळाल्या. हर्स्टने अेक अेक अशा आणखी दोन धावा काढल्या आणि अखेरीस त्याने सामना बरो-बरीला आणून सोडला. जनसमुदायांतील अेक पाद्री अितका कांहीं प्रभावित झाला कीं तो हर्षातिरेकाने क्रिडांगणाकडे धावत सुटला.

## 'जेसपचा सामना'

आतां त्याच ओव्हरमध्ये सामना-विजेता होण्याची ऱ्होड्सची पाळी होती. अर्थात् त्याने ते केले. ट्रम्बलने फेकलेला—पिचवर [illegible] वर आलेला चेंडू ऱ्होड्सने गोलंदाज व मिड-ऑन यांच्या मधून सरळ हांकला. आणि आपल्या ह्या विजयीवीरांचे अभिनंदन करण्या-साठीं क्रिडांगणावर हजारो चहात्यांची अलोट गर्दी लोटली.

इंग्लंडने "अशक्य २६३" धावा काढून अेक विकेटने जिकले. विश्वास सुद्धा बसणार नाही अशी धावांची भरपाई झाली कीं जेव्हां अेके-वेळीं सॅन्डर्सला १५ धावांत ४ गडी बाद कर-ण्याचें श्रेय मिळत होतें, तेच त्याला २४ ओव्हरमध्ये १०५ धावावर ४ बाद करून पूर्ण करावें लागलें. स्किपर डार्लिंगने सुद्धा खुप परिश्रम घेतले. आणि ट्रंम्बलने १०८ धावावर ४ बाद केले.

खेळाच्या अखेरीस हर्स्टच्या नाबाद राहून ५८ धावा झालेल्या होत्या. जेसपच्या डावा इतकाच हर्स्टचा डाव त्याच्या परिने अप्रतिम झाला. शेवटच्या निकडीच्या क्षणाला त्याने इतके संयम राखले कीं त्याने जे अखेरचे १४ टोले हाणले, त्यांत सावधानीने त्याने अेक अेक अशा १३ धावा काढल्या. वस्तुतः याचे पूर्वीच त्याने सहा पल्लेदार चौकार हाणले होते. शिवाय त्या सामन्यांत हर्स्टने ८४ धावांत ६ गडी बाद केले. परंतु १९०२ चा पांचवा कसोटी सामना हा नेहमीकरितां "जेसपचा सामना" म्हणूनच अविस्मरणीय राहिला.

"गनिम" पवित्र्याचा जेसप हा त्याच्या वयाच्या ८१ व्या वर्षाच्या किंचित पूर्वी १९५५ मध्ये ख्रिस्तवासी झाला. पहिल्या दर्जाच्या क्रिकेट सामन्यांत जेसपने एकंदर सरासरीने प्रति तासाला ८० धावा काढून विक्रम प्रस्थापित केला. हा विक्रम कोणत्याहि खेळाडूने मोडलेला नाही. त्याच्या पेक्षा अधिक खळबळजनक क्रिकेटपटू दुसरा कोणीहि नव्हता. कोणीहि त्याच्या अितके चित्तथरारक डाव खेळले नाहीत. ओव्हल टेस्ट सामन्यांतील त्याच्या १०४ धावांची भर ही त्या खेळांतील महान अविस्मरणीय देण होय. जेसपच्या निर्भिड आणि प्रतापशाली टोलेबाजीने इंग्लंडची अशक्यप्राय दिसणाऱ्या अवस्थेतून सुटका केली आणि विजय सुसाध्य केला.

(आधारित)

•••

देशासाठीं जो देई रक्त
तोच खरा मातृभक्त



अनुक्रमणिका

जेव्हा खरोखर क्रिकेट खेळासारखा खेळ होत नाहीं. तेव्हां सहाजिकच प्रश्न उभा रहातो कीं........



# क्रिकेटवर बंदी कां घालूं नये ?

—तिरंदाज

**भारतांपुढील** अनेक समस्यांचा विचार करतां मनांत असा विचार येतो कीं आतां क्रिकेटवर वंदी घालण्याची वेळ आली आहे ! आपलें आर्थिक दारिद्रय, आणिवाणीची परिस्थिती, वाढती महागाई आणि योजनांचे महत्व लक्षांत घेतां आज क्रिकेटसारख्या खेळाला भारतांत जागा नाही. आजच्या परिस्थितीत क्रिकेट वंद केल्यानेंच देशाचे म्हणजे पर्यायानें लोकांचे अतिशय कल्याण होईल, क्रिकेटवर होणारा अवाढव्य खर्च योजनापूर्तीकडे वळवितां येईल, व निरर्थकपणें फुकट वेळ घालवण्याची लोकांची प्रवृत्ती राष्ट्रकारणीं कार्यान्वित करतां येईल. क्रिकेटमुळें लोकांचा वेळ आणि देशाचा पैसा फुकट खर्च होतो; आणि आज देशाला लोकांचे श्रम आणि पैसा यांचीच जास्त गरज आहे. क्रिकेट खेळ वंद करून मोठ्या प्रमाणावर देशसेवा साधतां येईल.

अकरा दुणे वावीस खेळाडूंनीं सामना खेळायचा आणि तो कमीत कमी वावीस हजार लोकांनी अवाच्यासवा पैसा खर्च करून वघत वसावयाचा, याला कांहीं अर्थ आहे कीं नाहीं ? आणि हा सामना चालायचा तरी किती वेळ ? रोज पांच तास— ओळीनें पांच दिवस ! म्हणजे प्रत्येक माणसाचें २५ तास अक्षरश: पाण्यांत गेले ! असें किमान वावीस हजार प्रेक्षकांचे प्रत्येकीं २५ तास वाया जाऊं लागले तर राष्ट्रीय संपत्तीचा फार मोठ्या प्रमाणावरचा तो व्ययच आहे.

लोकांना असा फुकट वेळ दवडण्याच्या संवयीमुळें ऐदीपणा, आळशीपणा यांचीच जास्त संवय लागण्याची शक्यता आहे. हॉकी. फुटवॉल, टेनिस व टेवल टेनिस हे खेळ वघत राहण्यानें वेळेची अशी हानी मुळीच होत नाही. तासादोन तासांचें ते खेळ असतात आणि चालतातहि कमी दिवस. पण क्रिकेट खात असलेल्या वेळेची कुणीच दखल घेत नाही.

एका फुटवॉलच्या किंवा हॉकीच्या सामन्यांत जेवढी खळवळ आणि रंगत वघायला मिळते, तेवढी हल्लीं क्रिकेटच्या टेस्टमध्यें भारतीयांना कधींतरी दिसते कां ? मी मुद्दाम "भारतीयांना" हा शव्दप्रयोग करत आहे. इतरत्र फार खळवळजनक सामने झाल्याचें मला ठाऊक आहे. पण भारतांतले सामने मात्र एकतर एकतर्फी होतात, नाहींतर अतिशय वेचव आणि अळणी होतात. त्यांत रंगत नसते, विजयासाठीं धडपड नसते. सारा मामला पराभव वांचविण्यांसाठीं चाललेला असतो. तरूणांनीं धडाडी शिकावी, विजिगिपु वृत्ती शिकावी असें कांहींच त्यांना क्रिकेटच्या खेळांमधून पहावयास सांपडत नाहीं. सगळाच मिळमिळीत कारभार ! दिवसांतून फक्त दोनशें धावाच काढल्या जायच्या, दोन दोन दिवस एकाच संघाची फलंदाजी चालू रहायची, त्यांत एकाहि खेळाडूची डोळयाचें पारणे फेडणारी फलंदाजी दिसणार नाहीं कीं चमकदार खेळाचे दर्शन घडणार नाहीं ! सततच्या प्रेक्षणीय टोलेवाजीचाहि आविष्कार घडणार नाही. एवढेंच नव्हे तर त्यांतून तुफानी गोलंदाजांचें अलिकडे प्रात्यक्षिकसुद्धा दिसणार नाहीं. "हल्लीं क्रिकेटमधून पट्कार आणि कव्हरड्राईव्ह पार नाहींसा झालेला आहे," असें जे कांहीं लेखक म्हणतात ते मुळींच खोटे नाहीं. प्रेक्षकांनीं जीव ओवाळून टाकावा असें हे दोन फटके ! पूर्वी सी. के. नायडूंनीं असे टोलेजंग फटके मारून नुसता जल्लोप उडवून दिला आहे. प्रेक्षकांनीं आनंदून जाऊन वक्षीसांचा नुसता वर्षाव केला आहे सी. के. नायडूंवर ! हे झालें पट्कारांचे. पण सार्वी आकर्पकता तरी आजच्या खेळाडूत कोठे दिसते ? अमरनाथ, देववर, पी. विठ्ठल, मुश्ताकअलि यांच्यासारखा मन जिंकणारा खेळ हल्लीं पहावयास सांपडत नाहीं. ते खेळाडू अस्तास पावले आणि त्यांच्यावरोवर त्यांचा खेळहि ! हल्लीचा खेळ झाला आहे नुसता निरस, कांतडी वचावू ! "टुकूटुकू" खेळत वसण्यांतच आजच्या खेळाडूला समाधान वाटते ! याशिवाय परक्यांच्या तुफानी गोलंदाजीपुढें आमचा टिकाव लागत नाही ते वेगळेच. फलंदाजांत असा हा भ्याडपणा शिरला आहे. धमकच नाहीं मुळीं ! असा कंटाळवाणा खेळ वघण्यांत काय गंमत वाटणार ? पांच—पांच दिवस खळून शेवटीं सामने अनिर्णितावस्थेंत संपतात. तोहि संघ जिंकत नाहीं; आम्हीहि जिंकत नाहीं. आमच्यांत सामना जिंकण्याची इर्षाच नाहीं मुळीं ! दुसरा जिंकू लागला तर त्यालाहि जिंकू द्यावयाचें नाहीं ! तांत्रिक खेळाच्या आहारी जाऊन. व वचावात्मक धोरण आंखून, पराभव

वांचवावयाचा ! झुंज देण्याची ताकदच आमच्या खेळाडूंत आतां उरलेली नाहीं ! खरोखरी पूर्वीचे दिवस आतां संपले आहेत. कधीकाळी क्रिकेटला वैभव असलेंच तर तें आतां उरलेले नाहीं.... आमच्या संघाच्या बाबतींत तरी खासच ! अशा कळाहीन, सत्त्वहीन, क्रिकेट खेळाचा देशाला आतां काय उपयोग आहे ? जो खेळ हल्ली बघण्यासारखा राहिलेला नाही तो चालू देण्यांत काय लाभ आहे?

भारतानें आतांपर्यंत पराभवच जास्त खाल्लेले आहेत. आमच्या विजयांची संख्या फारच तोकडी आहे. ऑस्ट्रेलिया, इंग्लंड व वेस्ट-इंडियन यांनीं आमचा सहज पराभव करावा. आम्ही भारी आहोत तें अगदीं दुबळ्या संघासमोर....न्यूझीलंड समोर ! पाकिस्तान-सारख्या, केवळ बारावर्षांपूर्वी आपला टेस्टचा इतिहास सुरू करणाऱ्या संघावरहि आम्हीं निर्विवादपणें मात करूं शकत नाहीं. एकंदरींत आमचा दर्जा फार खालावलेला आहे. निकृष्ट पातळी-वरचा संघ म्हणून आमची सर्वत्र अवहेलना होते. इंग्लंडनें आमच्या बरोबर तीन दिवसांचेच सामने खेळावेत, अशा तऱ्हेची सुचना पुढेंच करण्यांत येते. याचाच अर्थ, आमच्या संघाबद्दल बाहेर कोणती मतें आहेत हें स्पष्टपणें दिसून येते. क्रिकेट खेळणाऱ्या राष्ट्रांचे "अ" आणि "ब" असे दोन वर्ग करण्यांत यावेत आणि आम्हांला त्यापैकी दुसऱ्या "ब" वर्गात ढकलण्यांत यावे असाहि प्रयत्न सध्यां चाललेला आढळतो ही आमच्या देशाची मानहानी नव्हें काय ? क्रिकेटनें म्हणे आमच्या देशाचा झेंडा सर्वत्र फडकत ठेवला आहे ! पण तो कधीं तरी कुठेतरी मानानें मिरवला आहे काय ? सगळ्या परक्या देशांत आमचा पराभव झाला आहे. एकाहि देशांत आम्हीं विजय मिळवूं शकत नाहीं ! क्रिकेटनें आमच्या देशाचें नांव उंच करण्यासाठीं काय केले ? ज्या खेळानें आम्हांला मान मिळवून दिला नाहीं तो खेळ खेळण्यांत तरी काय अर्थ आहे ? ज्या खेळांत आम्हीं सतत हरतो, आमचा क्रमांक नेहमी शेवटच्या एक दोन आकड्यांवर रेंगाळत रहातो तो खेळ खेळण्यांत काय हंशील आहे ?

हॉकीनें आपल्या देशाला कित्येक वर्षे यश मिळवून दिले. आमची प्रतिष्ठा वाढविली, आमच्या देशाचा आदर्श कित्येकांनीं त्या खेळांत नजरेसमोर ठेवला. आम्हीं त्यांत सर्वश्रेष्ठ ठरूं शकलो. देशाची मान अभिमानाने उंच होऊं शकली. तसें क्रिकेटनें कांहीं साध्य केले आहे काय ? मुळींच नाहीं ! उलट भारताचे सगळीकडे हंसेच झालेलें आहे.

आमचा देश नेहमीं हरतो. आमचें खेळाडूं अनाकर्षकपणें खेळतात. अशा परिस्थितींत पूर्वीचें वैभव गांठणे आज अशक्य दिसत असतांना हा खेळ बंद करावयास नको कां ? शिवाय, आज लोकशाही चालूं आहे. समाजवादी रचनेकडे आपला देश पावलें टाकत आहे. अशा वेळेला क्रिकेटसारख्या मांडवलवाल्यांचा खेळ भारतानें कां खेळावा ? क्रिकेटचा खेळ अजून गांवो गांवी गेलेला नाहीं. खेडोखेडी पसरलेला नाहीं. अशा परिस्थितीत हा "खेळांचा राजा" आपल्या देशांत तरी "लोकांचा राजा" होऊ शकत नाहीं. जनतेचा हा खेळ नाहीं. गरीबांचें हात बॅटी धरूं शकत नाहींत. श्रीमंतांच्या हातांतच बॅट जाऊं शकते आणि श्रीमंत लोकच हा खेळ खेळूं वा पाहूं शकतात. अशा मांडवलवाल्यांचा खेळ आपल्य देशाला कसा झेंपु शकेल ?

आमचीं राज्य सरकारें आणि मध्यवर्ती सरकार हजारो रुपये या खेळावर सढळ हातानें खर्च करीत आहेत. सरकारनें पोसलेला हा एक पांढरा हत्तीच आहे. एवढा खर्च करूनहि कितीसे खेळाडू पुढें आले ? भारत देश या खेळांत कितीसा प्रगती करूं शकला ? इतिहासाची साक्ष काढून पाहा आणि सांगा.

क्रिकेटची मंडळें तर गबर पैसा गांठीशी मारून लहानमोठी संस्थानेंच झाली आहेत. सरकारनें या देशांत पुर्वापार चालत आलेली, संस्थानिकांची संस्थानेसुद्धां नष्ट केली अशा परिस्थितींत अशी क्रिकेटची नवी संस्थानें ठेवून काय उपयोग ? त्या क्रिकेट मंडळांत तर खर्चावर नियंत्रण नसते आणि तिथें "राजकारणाचा" नुसता धुडगूस चालूं असतो, मध्यवर्ती क्रिकेटमंडळ तर अनियंत्रीतपणें कारभार करीत असते. त्यांत सत्तालोलूप आणि अज्ञ लोकांचाच भरणा असतो. गतवर्षी पांच वेस्टइंडियन गोलंदाज आणून हजारो रूपयांचे परकीय चलन खर्च करण्यांत आले. यांतून एकतरी आघाडीचा गोलंदाज किंवा आघाडीचा फलंदाज मिळाला कां ? आज देशाला परकीय हुंडणावळीची चणचण असतांना हा खर्च कशाला? सद्यपरिस्थितींत खुद्द क्रिकेटमुळें आणि त्यांतील अशा खर्चामुळें आर्थिक टंचाई अधिक वाढण्याचीच शक्यता जास्त आहे.

आजचें जग धांवते झाले आहे. ह्या दिवसांत पांच पांच तासांचा खेळ कोण बघत राहील ? जिन्नसांचे भाव वाढत आहेत. अशावेळीं गरजेच्या वस्तू विकत घेण्याऐवजीं बॅटी व बॉलमध्ये कोण खर्च करील ? अशा या दीर्घमुदतीच्या व महागड्या खेळाची देशाला आज मुळीच जरूरी नाहीं. देशाला आज क्रिकेटमधले गोलंदाज नकोत. खरे "गोलंदाज" पाहिजेत; देशाला आज क्रिकेटपटूंची जरूरी नाही— लढाऊ वीरांची गरज आहे. अशारितीनें, आजच्या बदलत्या काळाची पावलं ओळखुन व नव्या जगाचा व्यवहारवाद जाणून घेऊन "क्रिकेट बंद करा" असेंच कुणीहि सुज्ञ मनुष्य म्हणेल.

● ● ●

वाचकहो, तुम्हीहि या मताशी सहमत व्हाल. तुमची प्रतिक्रिया व मतं काय आहेत ते समजले तर उत्तम होईल; या एका महत्व-पूर्ण समस्येचें सर्व बाजूंनीं मंथन तरी होईल. तरी तुमची मतं जरूर कळवा. त्याला प्रसिद्धी देऊं व पहिल्या दोन चांगल्या मत-प्रतिपादित लिखाणाला अनुक्रमें १० व ५ रुपयाची दोन बक्षिसें पण देऊ —

—संपादक

### क्रिकेट आणि किंगकाँग :



असं म्हणतात कीं क्रिकेटपटूंचं जास्तीत जास्त वजन फार तर बॅटच्या वजनापेक्षां शंभर पटीनें अधिक असूं शकतं पण कांहीं क्रिकेटपटूंचं वजन इतकं होतं कीं तें क्रिकेटमधील किंगकाँग शोभावेत —ती नररत्नें अशीं—

डब्ल्यू. फॉक् (डर्बीशायर) ३२२ पौंड

डब्ल्यू. डब्ल्यू. आर्मस्ट्रॉंग (व्हिक्टोरीया) ३०८ पौंड

डॉ. डब्ल्यू. जी. ग्रेस (ग्लाऊसेस्टरशायर) २५२ पौंड

जॉर्ज ब्राऊन (ससेक्स्) २५२ पौंड

योगायोग बघा पहिल्या तिघांच्या नांवांतील आद्याक्षर Weight मधील डब्ल्यू आहे !

अनुक्रमणिका



हे असे आहेत

# भारतीय खेळाडू

—क्रीडाप्रेमी

**येथून तेथून सर्व सारखेच. सारेच संघ मंद खेळणारे. भारतीय खेळाडूंना त्यांच्या खेळाची खरी प्रचिति या लेखांत घडेल. ते वाचून त्यांनी आतां तरी आपल्या अकरणात्मक प्रकृतीवर विजय मिळविला पाहिजे...तसें होईल कां...?**

आक्रमक 'कप्तानपद'......

ह्या लेखाचें शीर्षक वाचून तुम्ही म्हणाल, "छे उबगलो बुवा, अशा त्याच त्याच लेखांना ! काय हे संपादक. कुठलाहि दौरा आला कीं कोणत्याहि लेखकाला वेठीस धरतात आणि त्यांना भारतीय खेळाडूंचा परिचय लिहीण्याचें काम देतात. मग तोच तो मांजरेकर आणि तोच तो नाडकर्णी. मांजरेकरचा जन्म मुंबईला झाला, त्याचे संबंध नांव विजय लक्ष्मण मांजरेकर असे असून त्याने आपल्या टेस्ट क्रिकेटला प्रारंभ वयाच्या अवघ्या २० वर्षापासून केला, मांजरेकर म्हणजे भारतीय क्रिकेटचा कणाच आहे... नाडकर्णीचा जन्म नाशिक येथें झाला– तो डावखोरा फलंदाज आहे, गोलंदाजींत तो भारताचा विनू मन्कड समजला जातो. तो आपली पहिली टेस्ट १९५५ सालीं न्यूझीलंड विरुद्ध दिल्ली येथें खेळला—- तेच ते पुन्हा...पुन्हा....पुन्हा पुन्हा तेच ते."

१९६१ सालीं दौरा आला तरी तेच लिहीले जाणार, ६२ साली आला तरी दुसरा कोणताहि लेखक तेच लिहीणार, ६३ साली तेच आणि ६४ सालीहि तेच. प्रत्येक खेळाडूबद्दल असा मजकूर कंपोझ करून ठेवला तरी त्याचा उपयोग कुणासहि, कुठल्याहि वर्षी होऊ शकेल.

वाचकांना आता हे माहित झालेले आहे. त्यांना ठाऊक आहे कीं मांजरेकर हा मुंबईत जन्मला, नाडकर्णी नाशिकला जन्मला. यांना हेंहि ठाऊक असेल कीं नाडकर्णी कधींहि उजव्या हाताने गोलंदाजी करीत नाहीं. तो दिल्ली येथेंच पहिली टेस्ट खेळला-मुंबईला नाहीं. भारतीय क्रिकेट रसिकांची स्मरणशक्ति खरोखरीच अतिशय तीव्र आहे. त्यांना पुन्हा पुन्हा त्याच त्याच गोष्टी सांगितल्यास त्यांत गोडी वाटत नाहीं, नाविन्य वाटत नाहीं. खेळाडूंचें गुण त्यांना पूर्ण परिचयाचे झाले आहेत.

आणि खास क्रिकेट अंकांतून येणाऱ्या कुठल्याहि लेखांत टेस्ट खेळाडूची स्तुति झालीच पाहिजे असाहि एक जणूं हल्ली संकेतच पडून गेला आहे. कृपालसिंगाचा खेळ बघितला नसला तरी 'परिचय नायक' म्हणून त्याची स्तुति झालीच म्हणून समजा.

तेव्हा ह्या लेखांत स्तुतिपाठकाची भुमिका न घेतां आणि खेळाडूबद्दलची जुनी माहिती वाचकांना ठाऊक आहे हे गृहीत धरून थोडी नवीं चाकोरी पाडण्याचा प्रयत्न आहे. तेव्हा या ठिकाणीं भारतीय खेळाडुंचें मुख्य दोष काय आहेत त्यांचाच प्रामुख्यानें उहापोह करावयाचा आहे. अर्थात इथे निंदकाचीहि भुमिका नाहीं. गुण मान्य करून जे दोष खेळाडूत दिसतात ते इथे प्रामाणिकपणें दाखवले आहेत. इथे तुम्हाला बोर्डेच्या विकेटस् किती झाल्यांत, दुराणीनें धांवांची शंभरी केव्हां काढली आहे वगैरे आकडेवारीची चिरपरिचित माहिती मिळणार नाहीं. खेळाडुची वैगुण्ये व तो किती धांवा काढतो यापेक्षां कसा खेळतो याविषयींची थोडी नाविन्यपूर्ण माहिती मिळेल. यांत खेळाडूबद्दल वाचकांच्या व प्रेक्षकांच्या खऱ्या अपेक्षा काय आहेत हेच तुम्हाला वाचायला सांपडेल.

प्रथम मांजरेकरच घेऊ या ना !

मांजरेकरबद्दल मनांत प्रामुख्यानें प्रश्न येतो तो असा कीं सध्याच्या संघांतला हा सर्वात जुना अन् अनुभवी खेळाडू. भारतांतला तथाकथित वाकबगार फलंदाज. मग हा टेस्टमध्यें इतका कंटाळवाणी फलंदाजी कां करतो ? इतके वर्षे क्रिकेट खेळलेल्याला, जग हिंडलेल्याला थोडा तरी आत्मविश्वास आला पाहिजे ना ? मग मांजरेकर प्रत्येक टेस्टमध्यें एखाद्या नवीन खेळाडूसारखीं संथ सुरवात, आणि बचवात्मक फलंदाजी कां करतो ? इतका सराव झालेल्या खेळाडूने कसे निर्भयपणें आणि सहजतेने खेळलें पाहिजे. मांजरेकरकडून प्रेक्षकांची ही अपेक्षा आहे. त्याचा खेळ फार सावध संथ व संरक्षणात्मक होतो हा त्यांतला प्रमुख दोष आहे. हा दोष सुधारण्याचा त्याने कधीच प्रयत्न केलेला नाहीं हा त्यांतला आणखी दुसरा दोष. खरे म्हणजे नवीन पिढीला मांजरेकर सारख्यानें धडा घालून द्यायला नको कां ? मांजरेकर सारख्याचा



अनुक्रमणिका







आदर्श डोळ्यासमोर ठेवणारा खेळाडू कधीहि स्वैरपणें फटकेबाजी करणार नाहीं, उलट अगदीं जपून, मापून, साहस न पत्करतांना फलंदाजी करेल याबद्दल मला तरी शंका वाटत नाहीं.

सी. के. नायडू, देवधर, पी. विठ्ठल, रणजी, दुलीप ही जुनी पिढी आपल्यापुढें कोणता कित्ता घालुन गेली ? पण याचा मांजरे-करचे मनावर कांहींच कसा परिणाम होत नाही ? त्याने घालून दिलेला कित्ता खास आदर्श नव्हे, अनुकरणीयहि नव्हे.

मांजरेकरचे म्हणे तंत्र अचूक आहे. असेल. पण मग उलट तेच. आत्मसात करणाऱ्या खेळाडूला चेंडुवरहि मात करतां आली पाहिजे व उत्कृष्ट फटकेबाजी करून जलद धांवा वाढवतां आल्या पाहिजेत. मांजरेकर अशा प्रकारें कधीं खेळतो कां ? तंत्र येणें म्हणजे कांहीं नुसते टुकटुक करणे नव्हे. चेंडुवर तुटून पडायला काय तंत्र शिकवत नाहीं ? कव्हर ड्राईव्ह कसा मारावा हे काय तंत्रांत नसते ? पाक व इंग्लंडविरुद्ध मांजरेकरने मुंबई टेस्टमध्यें चांगल्या धांवा केल्या. (किती ते मी मुद्दाम तुम्हाला सांगत नाहीं. कारण त्या तुम्हाला माहितच आहेत.) पण खेळ किती निरस केला. प्रेक्षक विटलें. पंख्यानें वारा घेत शेंगादाणे खात बसले ! स्वतःच्या पन्नास किंवा शंभर धांवा झाल्यानंतर मांजरेकर साहेब बहारीचे फटके मारु लागले. हे असे कां ? त्याच्यासारख्या मुरब्बी खेळाडूनें धावांच्या आकड्यापेक्षां फटक्यांतील आकर्षकतेनें प्रेक्षकांची मनें जिंकली पाहिजेत.

म्हणूनच मी म्हणतो की मांजरेकर प्रसिद्ध आहे हे खरें पण तो लोकप्रिय नाहीं हे तितकेंच खरें.

आणखी असे कीं मांजरेकर शरीरानें किती स्थूल झाला आहे. त्याने आपल्या शरीर प्रकृतीची देशाच्या हितार्थ निगा का राखू नये ? त्याला वड पळतां येत नाहीं. अर्थात त्याचमुळें त्याचे क्षेत्र-रक्षण सामान्यतः नेहमींच गचाळ होतें. हे एक सत्य आहे पण ते कोणी मांडत नाही !

त्यानंतर शेवटी असें कीं मांजरेकर हा बोलून चालून धंदेवाईक खेळाडू आहे. तो प्रथम स्वार्थ पाहतो, पुढच्या टेस्टची बेगमी करून ठेवतो आणि मग स्वैरपणें खेळू लागतो असे जर त्याच्या बद्दल म्हटले तर ते चुक ठरेल कां ? धंदेवाईक पद्धतीचे दोष मांजरेकरच्या खेळांतून असें प्रतीत होतात.

मांजरेकरनें नवीन खेळाडू तयार केला आहे कां ? मुळीच नाहीं. तसेंच त्याचे नांव अद्याप कधीं कप्तानपदासाठीं सुचवले गेलें आहे कां? तेहि नाहीं. अर्थात हे शेवटचे दोन्ही गौण मुद्दे आहेत. त्यांचा येथें केवळ उल्लेखच करतो. एकूण काय मांजरेकर हल्ली लोकांच्या अपेक्षा पुऱ्या करीत नाहीं हेंच दिसून येईल. मांजरेकरच्या वागणुकी-बद्दल येथें लिहीत नाहीं, कारण तो सध्या आपला विषय नव्हे. नाहीतर त्या विषयीहि खूप लिहितां येईल.

नंतर घेऊ **मेहेराचा** परिचय. प्रथमच हे सांगितले पाहिजे कीं मेहेरा पहिली टेस्ट खेळला तीच मोठी आश्चर्यकारक रीतीनें.



......आणि हा कूर्मगति खेळ ?

१९५५ साली न्यूझीलंड संघ भारतांत आला होता, त्या वेळीं विजय मेहेरा मुंबईला पहिली टेस्ट खेळला. (हे केवळ येथें आवश्यक म्हणून सांगितलें.) त्या नंतर त्याला चान्स मिळाला तो एकदम् ६१ साली इंग्लंडविरुद्ध ! म्हणजे तब्बल सहा वर्षानंतर ! मग इतकें वर्षे मेहेरावर कोणाची मेहेरनजर कशी काय झाली नाही ? त्याचें असे आहे कीं मेहेरा जेव्हां पहिली टेस्ट खेळला तेव्हां भारतीय निवड समितीचा अध्यक्ष होता अमरनाथ. त्याचे व मेहेराचे संबंध चांगले आणि त्यामुळें पक्षपात होऊन त्यावेळीं मेहेराला खेळवण्यांत आलें असें क्रिकेट वर्तुळांत बोललें जातें. त्यावेळीं मेहेरा टेस्टला मुळींच लायक नव्हता. त्या टेस्टमध्येंहि त्याने फारशा धावा केल्याच नाहींत. पुढें अमरनाथनेंच त्याला वगळलें. असा हा खेळाडू पुढें इतरांनीं निवडावा कसा ? वशील्याचा म्हणून त्याचेकडे अमरनाथ नंतर आलेल्यांनी बघितलें. दरम्यानच्या काळांत मेहेरानें खरोखरच आपला खेळ सुधारला. आणि त्याला निवड समितीचें आपल्याकडे लक्ष वेधण्यास फार काळ घालवावा लागला.

हे एक झालें. आता मेहेरा जरी चांगल्या भरघोस धावा काढू लागला आहे तरी त्याचाहि खेळ किती चिकटपणें होतो ! फार चिवटपणें रटाळ खेळत बसतो हा मेहरा. संघांत स्थान मिळवण्या-साठीं तो असे खेळतो कां ? कदाचित् असेल.

**एकूण काय सगळेच 'विजय' सारखे. विजय मर्चंट काय, विजय हजारे काय, विजय मांजरेकर काय किंवा विजय मेहेरा काय. सारेच संथ, मंद, खेळणारे. त्यांनीं खरोखरीच आपल्या अकरणात्मक प्रकृतीतर आतां 'विजय' मिळवला पाहिजे.**

**जयसिंह**— हा खेळाडू रणजी ट्राफीसारख्या सामन्यांतून तडफदार-पणें फलंदाजी करतो असा त्याचा लौकिक आहे. परंतु हा रणजी-

मधला 'सिंह' टेस्टमध्यें अगदींच 'शेळी' कां बनतो हे कळत नाहीं- कलकत्त्याला ऑस्ट्रेलिया विरुद्ध त्यानें ज्या ७४ धावा केल्या त्याला किती मिनीटें घेतलीं हे तुम्हाला आठवते ना? तब्बल ३९३ मिनिटें! म्हणजे ६ तास ३३ मिनिटें! याचाच अर्थ, प्रत्येक धाव मिळा‌वयाला त्याला ५.५ मिनीटे खेळावें लागलें! हा त्याचा डाव जगांतला एक संथ डाव ठरतो! शिवाय कानपूरला पाकविरुद्ध खेळतांना त्याचें शतक चुकले तेव्हांहि तो किती निरस, निःसत्त्वपणें खेळला होता? आणि त्याचे शतक तरी कां चुकले? केवळ मानसिक दडपणामुळें! 'नर्व्हस नायन्टीज'मुळें!

हे असो. पण टेस्टमध्ये पहिल्या जोडींत खेळणारा हा गडी (स्वतः कप्तान असतांना देखील) रणजी ट्रॉफी सामन्याचे वेळीं चवथ्या क्रमांकावर कां खेळतो?

किंबहुना असेंहि विचारतां येईल कीं रणजी-दुलीप सारख्या मह‌त्वाच्या सामन्यांतून चवथ्या क्रमांकावर खेळणाऱ्या ह्या खेळाडूस टेस्टमध्यें पहिल्या जोडीसाठीं कां निवडण्यांत येते? पहिल्या जोडींत खेळणाऱ्या खेळाडूस नव्या चेंडूवर खेळण्याचा नित्य सराव पाहिजे हे निवड समितीला ठाऊक नाहीं कां? निदान जयसिंहाला तरी या गोष्टीची जाणीव पाहिजे. रणजी ट्रॉफींतहि त्यानें पहिल्या जोडी‌मध्येंच खेळले पाहिजे. आणि टेस्टमध्यें त्याला निवडले तर खालच्या क्रमांकासाठींच निवडले पाहिजे.

सावें तत्व जयसिंह जाणूं शकत नाहीं याचें आश्चर्य वाटल्या‌वाचून रहात नाहीं. तो एका जबाबदार संघाचा कप्तान आहे आणि भारतीय संघाचा प्रमुख खेळाडू आहे. याची जाणीव ठेवून त्यानें व्यवहार्य व तात्विक धोरण आखलें पाहिजे. आणि १५ टेस्ट खेळून जयसिंहानें अद्यापपावेतों केवळ एकच शतक काढलेले आहे हेहि लक्षांत ठेवले पाहिजे!

जयसिंह म्हणजे कांहीं नामांकित अथवा प्रभावी गोलंदाज नव्हे. रणजी ट्रॉफींत एक दोन विकेट घेण्यापर्यंतच त्याची मजल जाते. आणि शिवाय तो फास्ट बोलर नव्हेच नव्हे. तरी परंतु भारतीय संघ अजूनहि त्याच्याकडे आघाडीचा गोलंदाज म्हणून बघतो याचे कोणास नवल वाटणार नाहीं? एकाच नटास दोन भूमिका देऊन पैसे व श्रम वाचवण्यासारखें झालें हें. जयसिंह हाच आपला आघाडीचा फलंदाज आणि तोच आपला आघाडी गोलंदाज! वा: काय 'जोक' आहे! जयसिंहानें (व निवड समितीनें) या अडचणींतून संघास सोडवले पाहिजे. एकूण काय, उम्रीगरनें व रामचंदनें (म्हणजे मध्यमगती गोलंदाजानीं) आघाडीवर गोलंदाजी करून चेंडू कसा तरी जुना करायचा – हे आपले दिवस अजून संपत नाहींत. आपली आघाडीची गोलंदाजी अजून मध्यम गति चेंडु फेक्यांच्या ताब्यांत असावी यासारखी दुसरी लाजिरवाणी गोष्ट कुठली असेल?

**चंदू बोर्डे**—सुदैवानें चंदू बोर्डे हा आपला असा एक खेळाडू आहे कीं त्याच्यांतले दोष काढणें अवघड आहे. कारण त्याच्यांत दोष कमी आहेत ही वस्तुस्थिति आहे. फलंदाज, गोलंदाज, क्षेत्र‌रक्षक व कप्तान अशी त्याची चौफेर कामगिरी चांगली आहे.

मात्र दोन गोष्टी लक्षांत घेण्यासारख्या आहेत. त्या म्हणजे बोर्डेचा स्क्वेअर कट. हा फार धोक्याचा असतो. खेळायला आल्या‌बरोबर 'सेट' होण्यापूर्वीच तो हा फटका मारूं लागतो. हे बरें नव्हे. याचमुळें फलंदाजींत बोर्डेला सातत्य दाखवतां येत नाही. प्रत्येक टेस्टमध्यें बोर्डे हमखास स्कोअर करील असें कोणालाच सांगता यायचे नाहीं. प्रत्येक सोडा पण कुठल्याहि विशिष्ट टेस्टचे उदाहरण घ्या.

दुसरें असें कीं—बोर्डे हा 'जेनुईन' लेगब्रेक' बोलर नव्हे. तो खात्रीलायक 'विकेटस्' घेईलच असे नाहीं. त्याचा दर्जा यांत निश्चित कमी आहे.

गोलंदाज म्हणून सुरवातीला रणजी ट्रॉफींत शिरलेला हा खेळाडू आज भरवशाचा गोलंदाज नसावा हे कशाचें गमक आहे? वास्त‌विक पहातां लेग ब्रेक, गुगली गोलंदाजाला पुष्कळ विकेटस् मिळा‌यला पाहिजेत, नेहमीं मिळतातहि. परंतु बोर्डे हा ६१ सालचा इंग्लिश संघाविरुद्धच तेवढा गोलंदाजींत चमकला. एरवी कधींच नाहीं. आणि तरीहि निवड समिती त्याला संघातला एकमेव लेग ब्रेक बोलर म्हणून निवडते त्यावेळीं अचंबा वाटतो.

**रांजणे**— हा तथाकथित 'फास्ट' बोलींग टाकतो हे तुम्हास सांगायला नकोच. इतर गुण मान्य करून रांजणेच्या बाबतींत असें विचारलें पाहिजे की त्याच्या गोलंदाजींत वैचित्र्य कितीसे आहे. 'व्हरायटी' किती आहे? ठोकळेबाजपणानें तो एकामागून एक चेंडु टाकत बसतो इतकेंच. त्यांत ना बंपर, ना स्विंग. रांजणेच्या हा रांगडेपणा त्याला भारतांतला सर्वोत्कृष्ट गोलंदाज म्हणायच्या आड येतो. आणि रांजणेनें तरी अलीकडे रणजी – दुलीप ट्रॉफींतून कधीतरी ४ किंवा ४ हून जास्त विकेटस् घेतल्यात कां? त्याच्या एकूण विकेटस्‌ची संख्या यंदा रणजी ट्रॉफीमध्यें केवळ ११ च होती. सौराष्ट्रासारखा कमजोर संघाविरूद्धहि त्याला जास्त विकेटस् घेता आल्या नाहींत—तो स्वतः "होम-विकेट" वर खेळत असूनसुद्धां.

**पतौडी**—पतौडीचा खेळ कांहीं मी बघितलेला नाहीं. बाकी सर्वांचे खेळ बघितलेलें आहेत. तथापि ऐकीव व वाचलेल्या माहितीवरून असें दिसते कीं पतौडी चेंडु मारतो तों उंच म्हणजे त्याचे स्ट्रोक्स' 'अधीश' असतात. आणि हे तो सुरवातीपासूनच करतो. दुसरी गोष्ट म्हणजे त्याची अधु दृष्टि कितपत बरी झाली हे समजलेले नाहीं. ती बरी झाली असेल तर उत्तमच. नसतां पतौडीच्या गुण‌प्रभेला निश्चित मुरड पडणार. पतौडीला कप्तान करण्यांत दिल्लीच्या बलिष्ट क्रिकेट गटाचा हात आहे किंवा तो "बडे बापके बेटा" आहे हे सपशेल खोटे आहे. असें मुळींच नाहीं. सध्या दिल्लीचा गट क्रिकेटमध्यें प्रबळ आहे हें खरें पण पतौडीला कप्तानपद देण्यांत कांहीं दुरगामी, भारतीय संघाला फायदेशीर होणारे हेतु आहेत. तरीहि उम्रीगर सारख्याला त्याच्या हाताखालीं वेस्ट इंडीजमध्यें खळवणें हें पटण्यासारखें व कोणालाहि आवडण्यासारखे नाहीं.

पतौडीनें आपल्या सुरवातीपासूनच्या अनिर्बंध फटकेबाजीला थोडा समयानुकुल आळा घातला तर आजकाल त्याच्या हातामधून निसट‌लेले धावांचे सातत्य त्याला पुन्हा परत मिळवितां येईल.•

अनुक्रमणिका










मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






कप्तान असतांना तो लेगब्रेक गोलंदाजाकडे दुर्लक्ष करतो असा त्याच्यावर आक्षेप आहे. पण तो त्याला 'खोटा' पाडता येईल.

**सलीम दुराणी**—गतवर्षी ह्याला विचाऱ्याला एकहि रणजी ट्रॉफी खेळतां आली नाहीं. दोन्ही घरचा पाहुणा उपाशी अशी त्याची स्थिति झाली. मद्रासला वास्तव्य होते. पण मद्रासकडून खेळण्यासाठीं जी क्वालीफाईंग दिवसाची अट आहे ती त्याला पुरी करता आली नाहीं. यंदा मात्र राजस्थानकडून पूर्ववत खेळूं लागला आहे. मात्र दोन वर्षांप्रमाणें चमक दिसली नाहीं. विशेषतः विभागीय दुलीप सामन्यांत त्याच्याकडून बऱ्याच अपेक्षा होत्या. तो मांजरेकर, सूर्यवीर, हनुमंतसिंग हे खेळाडू असतांनाहि सेंट्रल झोनचा पराभव झाला. सलीम गोलंदाजी व फलंदाजी या दोन्हीहि अपेक्षीत पातळीपर्यंत जाऊं शकला नाहीं. हे फर्स्टक्लास क्रिकेटच्या सराव कमी पडला म्हणून झाले कां ? आतां तो टेस्टमध्यें काय करतो ते बघूं.

**रमाकांत देसाई**—पहिल्या टेस्टमध्यें घेतलें गेले नाहीं म्हणून यानें निराश होण्याचें कारण नाहीं. त्याला टेस्टची संधि देणें खरंच इष्ट ठरेल. परंतु हे नक्की कीं पूर्वीचा रमाकांत आज राहिला नाहीं. त्याच्या गोलंदाजींतला तो जुना प्रभाव आज पडत नाहीं. तसेंच तो फलंदाजी कधीच मन लावून करत नाहीं असा एक भास होतो. म्हणूनच त्याला फलंदाजींतलें धावांचे सातत्य ठेवतां येत नाहीं.

**नाडकर्णी**—फलंदाजींतला ह्याचा 'स्टान्स' फार बेढब दिसतो. बापू हल्ली फार वाकून पवित्रा घेऊं लागला आहे त्यामुळेंच की काय त्याचाहि टेस्टमधला खेळ फार दबकत दबकत होतो. म्हणूनच संथ, कंटाळवाणा बापू आजवर २१ टेस्टस् खेळला आहे पण रणजीमध्यें दोनदोनशे धावा काढणाऱ्या ह्या खेळाडूचे टेस्टमध्यें अजून एकहि शतक नाहीं—हे काय दर्शवते ?

गोलंदाजींत देखील बापू रणजीप्रमाणें टेस्टमध्यें यशस्वी होत नाहीं. हे सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट सत्य आहे. बापू हा विकेट टेकर नव्हे हे कबूल केलेच पाहिजे. आणि म्हणूनच तो 'विनू मन्कड' नव्हे हेहि वाचकांना हे किंचित कठोर वाटेल पण ते असें आहे खरें. एक धावा दाबून ठेवणारा गोलंदाज म्हणूनच त्याला किंमत द्यावी. जास्त नाहीं. यंदा त्यानें १६४·५ पटकांत ९४ पटकं निर्धाव टाकली. फक्त १९९ धावा दिल्या आणि १९ विकेटस् घेतल्या. हे आंकडे रणजी मधले आहेत. दुलीपट्रॉफींत त्याला एकहि विकेट मिळाली नाहीं मात्र निर्धाव पटकांची संख्या पाहून घ्यावी—४८ षटकं-२९ निर्धाव ३१ धांवा-० विकेट ! वरच्या वरच्या श्रेणीच्या क्रिकेटमध्यें अधिकाधिक निर्धाव पटकं टाकणारा पण कमी कमी विकेट घेणारा हा गोलंदाज आहे ! एकदां ऑस्ट्रेलियाविरूद्ध त्यानें मुंबईला उत्कृष्ट गोलंदाजी केली पण पुढे काय ? घेतल्या असतील कधी विकेटस् तर त्या बहुधा खालच्या क्रमांकावरील फलंदाजांच्या ! पण बापुचे अष्टपैलुत्व विसरतां येत नाहीं.

**सुर्ती**—सुर्ती तडफदार आहे खरा पण तो गंभीरपणें व विचारपूर्वक आपला खेळ करीत नाही असें वाटतें. तसेंच गोलंदाज म्हणून त्याला ओळखण्यांत येते. पण त्यांत त्यानें नांव घेण्यासारखीं एकदाहि कामगिरी केली आहे कां दाखवा. मंदगतीकहि नाहीं किंवा मध्यमगतींतहि नाहीं. फलंदाजींत तो प्रसंगाचे गांभीर्य ओळखून खेळेल तर तो अधिक चमकेल.

**सरदेसाई**—गतवर्षी हा पूर्णतया 'ऑफफॉर्म' होता. यंदा अजूनहि म्हणावा तसा त्याला फॉर्म लागलेला नाहीं तरीहि सुर्तीऐवजी मद्रासला त्याला घेण्यांत आले हे त्याचे नशीब. सुरवातीला कॅच दिला नाहीं तर तो अजूनहि चांगल्या धावा काढील. सरदेसाईला पहिल्या जोडींत पाठवण्याची मात्र कोणीहि घोडचूक करू नये. त्यामुळे त्याचा खेळ खराब होईल. महत्वाची सूचना अशी कीं फलंदाजींत त्याचा 'मांजरेकर' होउ नये याची त्यानें वेळींच दक्षता घेतली पाहिजे.

**इंजिनिअर**—फलंदाजींत कोणत्या क्रमांकावर जायचे हे त्यानें आतापासून ठरवले पाहिजे. व त्याप्रमाणें केले पाहिजे. एकदा खाली, एकदां वर असें केल्यानें फलंदाजींतील त्याचें सातत्य कमी होईल तसेंच यष्टिरक्षणांत तो कमालीची घाई करतो कांहीं कांहीं वेळेस त्यानें ताम्हणेचा धीरगंभीरपणा उचलला पाहिजे.

**कृपालसिंग**—दोनदां शिस्तभंगाचा इलाज झालेला हा खेळाडू कसा काय घेण्यांत आला ? आणि ह्याला म्हणे भारतीय संघाचा कप्तान करा अशी सूचना होती. 'पाली' असलेला हा कृपालसिंग 'पॉलीची' जागा भरून काढण्यास अगदीं असमर्थ आहे. पूर्वीचा जोर त्याच्यांत आता उरलेला नाहीं.

**कॉन्ट्रॅक्टर**—ह्याचे खेळांतहि पूर्वीचा दम नाहीं. तो हल्ली टोले उंचवून मारतो. मात्र नरीचे धैर्य अफाट आहे. पुन्हा खेळू लागण्याची त्याची चिकाटी वाखाणण्यासारखी खचित आहे.

**संग्राम गायकवाड**—अधिकारीचे अगोदर ह्याला टेस्टमध्यें संधि मिळाली तर ते एक आश्चर्य ठरेल पण तेहि कांहीं आश्चर्य नाहीं म्हणा. कारण अधिकारीचा भाऊ कांहीं क्रिकेट बोर्डाचा अध्यक्ष नाहीं कुंदरनची बेफिकीरी वृत्ति सुधारली कां ? बाळू गुप्ते अजून भावाची 'उंची' गोलंदाजींत गांठू शकत नाहीं ! राजेंद्रपाल निवडला ह्यांत कांहीं नवल नाहीं. कारण आपले सगळेच 'फास्टबोलर्स' हे एका माळेचे मणि झाले आहेत. त्यांतून काळे-गोरे काय निवडायचे ? असा हा नव्या धर्तीनें सर्वांचा परिचय करून देण्याचा प्रयत्न आहे.

●●●

**महत्वाची सूचना-**

**ज्यांची वर्गणी या अंकानें संपते त्यांनीं कृपा करून येत्या १० तारखेच्या आंत आपली पुढील वर्षाची वर्गणी पाठवून द्यावी. व्ही. पी. पद्धत नाहीं.**

**— व्यवस्थापक**

# ते चौरंगी दिवस

–वारकरी

## वैभवशाली खेळाने अढळपद मिळविणारे क्रिकेट सप्तर्षि



**सी. के. नायडू, जहांगिरखान, पी. विठ्ठल, श्री. देवधर, एल. पी. जय, होमी फजीफदार, एस. आर. गोडांबे**

**शुक्रवार,** १० जानवारी. सकाळचे अकरा वाजून गेले आहेत. शेजाऱ्याच्या रेडिओवर क्रिकेट कॉमेंटरी चालू आहे. हो, आज मद्रासला इंग्लंडविरुद्ध आपला पहिला कसोटी सामना सुरू झाला ना ! घराघरांतून रेडिओभोंवती भाविक श्रोत्यांचे कडे जमले असणार. विनाका नंतर इतक्या निष्ठेनें ऐकायचा कार्यक्रम हाच. रस्त्यावरहि रेडिओवाल्या दुकानांच्या आंत-वाहेर घोळके घोंगावत असतील. आणि या पुण्यांत ठिकठिकाणी कोणी फळ्यावर पुणेकरी उत्साहानें (पण चुकतमाकत) 'स्कोअर' टिपून ठेवत असतील – इतरांस शहाणे करावें या सद्धेतूनें.

रेडिओवर काय चालले आहे तें इतक्या अंतरावरून कळत नाही, कधी पुढचांत बसूनहि कळत नाही म्हणा ! वृत्तांत सांगणारे तिघे असणार; आळीपाळीनें सांगणार. वीस-पंचवीस वर्षांपूर्वी बॉवी तल्यारखांनचा अखंड वाग्यज्ञ चालू असे; पण एक क्षण कंटाळा येत नसे. त्यासम तो.

खेळ मंदावला कीं वेळभरतीसाठीं निवेदकानें जुना इतिहास उकरावा हें योग्यच. यापूर्वी इंग्लंडचे चार पांच संघ येऊन गेले, त्यांच्या कर्तृत्वाची उजळणी झाली असणार. सव्वीस साली गिलिगनच्या नेतृत्वाखाली आला तो पहिला. त्याच्याविरुद्ध हिंदु संघांतून खेळतांना सी. के. नायडूनें अकरा षट्कार चढवून आदल्या दिवशीच्या अर्लच्या आठ षट्कारांचा नक्षा कसा उतरविला याची निवेदकाच्या आठवणीला रसभरीत उकळी आली असणार. आणि तेहतीसच्या पहिल्या कसोटी–सामन्यांत अमरनाथनें अठरा चौकारांच्या शतकानें जार्डीनच्या संघाची कशी दाणादाण उडवली याची रम्य कथा. आणि नंतरचे संघ......

या वयस्क आठवणी; चाळिशीआंतील श्रोत्यांना अगदींच इतिहासजमा वाटणाऱ्या. दुसरी कदाचित गोट्यागोंवन्यासारखी बाल-स्मरणांत घुमत असेल. पन्नाशीपारच्यांना मात्र ती बहादुरी न पहातांहि पाहिल्याचा भास होत असेल; पण पाहिल्यालवरलेल्यांचें काय ?

....अशा वेळीं आठवणींची उबळ आवरतां आवरत नाही. उलट्या पावलानें मन चालू लागले की जणूं जितकें दूरचे तितकें त्याला अधिक स्वच्छ दिसू लागते. निदान दिसते असे वाटते. जें तेव्हां मनांत ठसलें तें स्मृति-च्छटांनी अधिक देखणें होतें; जें मुळांतच नीट ठसले नाही तें पुसट होतहोत पाहातांपाहातां विरून जातें. यांत नवल नाही; मनुष्यस्वभाव आहे तो. 'गेले ते दिवस'ची रडसुरावट घोळ-वीत हल्लीचे सगळेंच हलकें असलें वळण लावणाऱ्यांविषयी बोलत नाही मी; त्यांना हल्लीचें ठाऊक नसलें तरी चालतें ! पण नवें आवडूनहि जुन्याच्या आठवणीनें फुलून जाणाऱ्यांविषयी आहे हें....






मुरलेल्या मद्याची म्हणे विशेष तारीफ असते. (मुरलेल्या लोणच्याची हा अधिक संभावित दाखला झाला असता !) तशी मुरलेल्या आठवणींचीहि. पण सगळ्याच मुरत नाहीत...नाहीत तेंच बरें; त्यांना जागा तर हवी.....

...सी. के. म्हटलें कीं— 'नायडू' म्हणायलाच नको; सी. के. एकच ! – सगळें तरारून जागे होते. कामाच्या (आताच्या आझाद) मैदानावरील बाँबे जिमखान्याची टुमदार हिरवी पिवळी इमारत (ती अजूनहि हिरवी पिवळीच आहे), आटोपशीर मैदानाभोंवती कुंपणवजा ठाकलेले तंबू, त्यांतील खुली जातीयता, आणि सहा आण्यांत मिळणारे बदाम-पिस्त्याचे पाकीट... पण हायरे दैवा ! आमच्या खिशांत तेव्हां सहा पैसेहि नसत.......

नसोत. आम्ही तेथें जात असूं तें सी. के. आणि विठ्ठल आणि देवधर आणि जय यांना पाहाण्यासाठीं. पाहून तृप्त वाटे; आणि त्यांनी कांहीं विशेष कर्तबगारी दाखवली तर धुंदीच चढे. तशी ते नेहमीच दाखवत असें कोणी पुराणिकानें जे हे त्ते कथन केलें तरी तें खरें मानू नका. ते अनेकदा थोडक्यांत जात. आमचा विरस होई; हिंदु म्हणून अधिक खट्टू होत असूं. पण त्यामुळें त्या श्रेष्ठांची सरासरी कमी झाली याचें दुःख करायचें ठाऊक नसे. त्यांनाहि नसावे, अशा मिजाशीत ते खेळत आणि निघून जात. सरासरीची ही बाणगट भाषा नंतरची– अणि विक्रमांचीहि (म्हणजे रेकॉर्ड्सची)... ते विक्रम करीत, पण आकड्यांचे नव्हेत; खेळाचे. आणि त्याचें तौलनिक अंकगणित कोणी ऊठसूट बडबडत नसे....

म्हणून सी. के. चा तो भीमपराक्रम फक्त १५३ धावांत आटपला. दुष्मनाच्या सवालाला वरचढ जबाब भिरकावून तो 'नमवित परती' परत आला. सी. के. नें मुंबईत द्विशतकहि कधीं काढले नाही; इतरत्र कधी काढले असेल कोण जाणे ! खरें म्हणजें शतकेंहि फार थोडी काढली. फिकीर नाही. धावांचा गल्ला जमविण्याचा त्याचा धंदा नव्हता. तसे शतकवीर गल्लीबोळांत– आणि वीकएंड सामन्यांच्या संक्षिप्त वृत्तांतांतील कंसांत— बुजबुजत असतात. तेहतीस साली दादी हवेवालानें एका मामुली संघाविरुद्ध ५१५ धावा काढल्या; बिचाऱ्याचे हंसे झाले. मोठ्या सामन्यांत तो उतरला कीं 'पांचसो पंदर' म्हणून त्याची चेष्टा करीत. आता त्या आकड्याचा दबदबा त्याला पावला असता !

सी. के. पुढे ब्रेबर्न स्टेडिअम्वर पंचरंगी सामन्यांतहि कांहीं वर्षे खेळला– आणखीहि कांहीं सामन्यांत. पण त्याच्या आठवणीला पक्कें कोंदण आहे ते बाँबे जिमखान्याचें–चौरंगी सामन्यांचे; त्या कोंदणांत तो एकला नव्हता; आणखी रथी महारथी होते. निदान ती हिंदु त्रिमुर्ति होती. संघाच्या बालेकिल्ला लढविणारी; बॅटिंगचा जणू कणाच. चौथ्या जागी विठ्ठल, पांचव्या सी. के. आणि सहाव्या देवधर. तिसऱ्या जागी जय. अर्थात कधी हा क्रम बदलेहि.. तेवीसच्या अटीतटीच्या अंत्य सामन्यांत सी. के. सलामीला आला– परदेशीसह. विजय तोंडाशी आला आणि परदेशी पडला. मग विठ्ठल आला– जणू विजयावर मुद्रा ठोकण्याच्या उपचारासाठीं. विठ्ठलच्या कप्तान गिरीचें तें पहिले वर्ष. एका अस्पृश्याच्या अधिपत्याखाली हिंदूनी गोऱ्यांचा पुरा पाडाव केला. आणि आपल्या अखंड श्रेष्ठत्वाची मुहूर्तमेढ रोवली.

पण विठ्ठलचे कौतुक होते तें त्याच्या हीन जातीचें नव्हे, कीं देवधरांच्या प्रोफेसरकीचे नव्हे. कौतुक त्यांच्या खेळण्याच्या कौशल्याचे होतें. विठ्ठलाच्या सफाईचें, देवधरांच्या दमदारपणाचें. सीके, मध्यें तुफान होतें आणि नजाकतहि होती. जयचा खेळहि गोंडस असे. यांतील कोणी जम बसून खेळत आहे अशी बातमी कोर्टांतील कचेऱ्यांत पसरली कीं धोतरें विजारी सांवरत कारकून आणि अमलदार मैदाकडे धावूं लागत. कित्येकदा ते तेथें पोंचण्याआंतच जम मोडलेला असे." उगाच विकेट दिली हो; चढवला गोळा.." मग आल्यासारखीं थोडी श्रवणभक्ति करायची आणि नंतर शेजाऱ्यापाजाऱ्यांपुढें त्याचें कीर्तन करायचें.....

आणखीहि होते. नवलेचें यष्टिरक्षण आणि परदेशीचें क्षेत्ररक्षण; चंदाराणा रामजींची डावी–उजवी फास्ट बोलिंग आणि गोडांबे व एस्. एम. जोशींची फसवी बोलिंग. (आजचे त्याच नांवाचे राजकीय पुढारी बोलिंग करू लागले तर कोणता ब्रेक टाकणार ते सामनेवाल्या खेळाडूला अगोदर सांगतील !)अमरसिंग आला तो हें युग संपल्यावर, आणि अमरनाथहि. एकोणतीस सालानंतर राष्ट्रीय चळवळीमुळें चौरंगी सामन्यांना चार वर्षांची विश्रांती घ्यावी लागली. त्यापूर्वींचे दिवस आता जागे झाले आहेत...

विठ्ठलचा धाकटा भाऊ शिवराम याला



बरं का, तो फलंदाजालाहि घाबरवतो–अर्थात चेंडू त्याच्याकडे पडला तर...........!

दोनदा पाहिला; मोठा भाऊ वाळू याला कधीच नाही. गणपतलाहि नाही. पण या बंधूंच्या कथा सदैव ऐकल्या; कोणा एकाचें नांव निघाले, तरी सगळ्यांचे सद्गदित स्मरण काढावें असा रिवाज होता.

त्या अजाण वयांत आम्ही क्रिकेटपुरते चांगलेच हिंदुत्वनिष्ठ होतो; पण अहिंदूंना कमी लेखण्याचें करंटेपण नव्हतें. पारशांपैकी कोला किंवा डॉली कापडिया किंवा वजीफदार मुसलमानापैकीं वझीर अली, नाझीरअली, किंवा युरोपियनांपैकीं होझी, ट्रॅव्हर्स असले खेळाडू लौकर 'आउट' झाले तर मारुती-रायाला पैशाचा तेलशेंदूर चढविण्याचा वायदा मनांतल्या मनांत करायचा; पण तो त्यांच्या विषयीच्या आदरमिश्र भीतीनें. ते भरांत येऊन खेळूं लागले तर बरेंहि वाटायचें मधून-मधून...

पुढें पंचरंगी सामने आले, आणि तेहि थांबले. क्रिकेट पुरते तरी आपण निधर्मी बनलो. गोरे तर निघूनच गेले; पारशांचे बळ संपुष्टांत आले. फाळणी नंतर मुसलमानसंघहि फिकुटला. हिंदूना विशेष प्रतिस्पर्धी उरला नाही— तेव्हां निधर्मीपणाच फायद्याचा ठरला रणजी ट्रॉफीच्या विभागीय सामन्यांचें आकर्षण इतक्या वर्षांनंतरहि यथातथाच आहे. आतां दुलीप ट्रॉफीच्या चौरंगी सामन्यांना जरा प्रतिष्ठा येत आहे. पण मुंबईकरांच्या उत्साहाला उधाण येतें तें कसोटी सामन्यांच्या वेळी, किंवा तसलाच एखादा परदेशी संघ आला तर. त्यांतहि निदान निम्म्या प्रेक्षकांचा उत्साह असतो तो खेळाशिवाय अन्य आकर्षणां विषयी !. ........

जाणत्याला ! खेळाचेंहि आकर्षण आहे, आणि तशा गुणाचे खेळाडूहि आहेत; नवेंनवें पुढें येत आहेत. कसबाचे विविध ढंग आहेत. मध्यंतरी कांहीं वर्षे कांहीं श्रेष्ठींच्या कर्तब-गारीभुळें अतिसावध, वेहिमती, वांझ खेळाची प्रथा पडली होती; सुदैवानें तिचे हंसे झाले. पुन्हा जुना दम उसळून येत आहे; खेळासारखा खेळ होईल असा विश्वास वाटत आहे....

...पण तरीहि जुन्या आठवणींचे रंग उडत नाहींत. कोठें त्यांतील एखाद्या मंतरलेल्या नांवाचा उच्चार झाला, एखाद्याचें चित्र पाहिले कीं महिरल्यासारखे होतें. आपण तें वैभव याचि डोळां देखिलें या विचारानें धन्य वाटतें. ●●●

# क्रिकेट आणि तुमची परिक्षा .... ?

**दीपावली क्रिकेट पुरवणी सोबतच वाचकांसाठीं ही प्रश्नपत्रिका देत आहोत. ही प्रश्नपत्रिका सोडवून आमच्याकडे १० फेब्रुवारी ६४ पर्यंत पाठवावे. ही प्रश्नपत्रिका तज्ञाकडून तपासण्यांत येईल. संपूर्ण प्रश्नपत्रिका अचूक असणारांस वार्षिक वर्गणीदार करण्यांत येईल.**

**प्रश्न १ ला–** बंपर व बीमर म्हणजे काय ते स्पष्ट करुन सांगा. त्यावर बंदी घालणें इष्ट आहे कीं नाही ? कां ?

**प्रश्न २ रा–** क्रिकेट मैदानाची आकृति काढून त्यांत जागा दाखवा—
(अ) गली (ब) स्क्वेअर पॉईंट (क) थर्ड मॅन (ड) कव्हर (इ) लाँग ऑफ (ई) मिडविकेट. (उ) सिली मिड ऑन (ऊ) स्क्वेअर लेग.

अथवा

क्रिकेट मैदानाची आकृति काढून त्यांत खालील स्ट्रोक्सची नेमकी दिशा दाखवा.
(अ) स्क्वेअरकट (ब) कव्हर ड्राइव्ह. (क) ऑफ ड्राइव्ह. (ड) ऑन ड्राइव्ह. (इ) पुल् (ई) हुक (उ) लेट कट् (ऊ) ग्लान्स.

**प्रश्न ३ रा–** खालीपैकीं कोणत्याहि तुमच्या दोन आवडत्या खेळाडवर प्रत्येकी २५ ओळी लिहा.
(अ) ब्रॅडमन (ब) सोबर्स (क) हटन. (ड) मर्चंट (इ) हनिफ (ई) ओनील. (उ) वॉरेल. (ऊ) हजारे

**प्रश्न ४ था–** खालील प्रश्नांची उत्तरें द्या—
(अ) भारताचे इंग्लंडकडून खेळलेले खेळाडू—नांवे सांगा.
(ब) भारताचे पाककडून खेळलेले खेळाडू—नांवे सांगा.
(क) 'सर' पदवी मिळवलेले खेळाडू किती व कोणते ?
(ड) 'पद्मश्री' अथवा अन्य भारतीय किताब मिळालेले खेळाडू किती व कोणते ?

**प्रश्न ५ वा–** खालील रेकॉर्डस् (विक्रम) द्या—
(अ) सर्वांत जास्त टेस्ट कोण खेळला आहे व किती ?
(ब) सर्वांत जास्त वैयक्तिक टेस्ट धावा (एका डावांतल्या) कोणाच्या नांवावर मोडतात ? किती ?
(क) सर्वांत जास्त टेस्ट विकेटस् (एकूण) कोणी व किती घेतल्या आहेत ?
(ड) टेस्टमधील एका डावातली संघाची सर्वोच्च धावसंख्या कोणती ? तो कोणी केली ?
(इ) भागीदारीचा (पार्टनरशिपचा) सर्वोच्च विक्रम कोणी केला ? किती धावांचा ?
(ई) टेस्टमधील जास्तींत जास्त वैयक्तिक शतकांचे रेकॉर्ड कोणी केले ? किती शतकांचे ?









(उ) टेस्टमध्ये खेळलेला सर्वात लहान खेळाडू कोण ? किती वर्षांचा ?
(ऊ) टेस्टमधील सर्वांत लहान वयाचा कप्तान कोण ? किती वयाचा ?

**प्रश्न ६ वा–** गुगली म्हणजे काय ? तसेंच चाईनामन म्हणजे काय ते गोलंदाजांचे उदाहरण देऊन सांगा

अथवा

आऊट स्विंग व आर्मर म्हणजे काय हे गोलंदाजांचे उदाहरण देऊन सांगा.

**प्रश्न ७ वा–** भारतातील नव्या व जुन्या फास्ट बोलर्सची नांवे सांगा. तसेंच इंग्लंड, ऑस्ट्रेलिया, न्यूझिलंड, दक्षिण आफ्रिका, वेस्ट इंडिज आणि पाकिस्तान या देशांतील प्रत्येकी दोन फास्ट बोलर्सची नांवे सांगा.

**प्रश्न ८ वा–** क्रिकेटजगांतील प्रत्येक देशांतल्या संघांतील सध्याच्या आघाडीच्य फलंदाजांची नावे सांगा. तसेंच भारतात होऊन गेलेल्या व चालू आघाडी फलंदाजांची नांवे द्या.

**प्रश्न ९ वा–** किमान ६ कॉमेंटेटर्सची नावे सांगून त्यापैकीं तुम्हाला कोण आवडतो ते सांगा अथवा तुमच्या आवडीचा देशी अथवा परदेशी क्रिकेट. टीकाकार कोणता चांगला ते कारणासहित सांगा.

**प्रश्न १० वा–** **जोडच्या जमवा**

| | |
|---|---|
| (१) उम्रीगरनें | (१) ४ शेंहून जास्त धावा दोनदां केल्या |
| (२) हनिफनें | (२) नामांकित गोलंदाज होता. |
| (३) पॉन्सफोर्डनें | (३) तिनशेंहून जास्त धावा दोनदां केल्या. |
| (४) हजारेनें | (४) १२ शतकें काढली. |
| (५) टॅलन हा | (५) नामांकित यष्टीरक्षक होता. |
| (६) वेडसर हा | (६) ८ शतकें काढलीं. |
| (७) मायकेल स्मिथ हा | (७) इंग्लंडचा आधारस्तंभ आहे. |
| (८) वॅरिंग्टन हा | (८) पूर्वीच्या एम. सी. सी. दौऱ्यांत उपकप्तान होता. |

**प्रश्न ११ वा–** **चुकीची वाक्यें दुरुस्त करा.**
(१) भारतातर्फे एका टेस्टडावांतील जास्तींत जास्त धावा उम्रीगरच्या असून त्या २२३ आहेत.
(२) लेकरनें एका टेस्ट सामन्यांत जास्तीत जास्त विकेटस् १७ घेतल्या व त्या भारताविरूद्ध घेतल्या.
(३) सी. एस. नायडू हा ऑफब्रेक बोलर होता.
(४) कन्हाई हा दक्षिण आफ्रिकेचा खेळाडू आहे.
(५) भारताचे चालू दौऱ्यापूर्वीचे टेस्ट विजय ६ आहेत.
(६) कॉंट्रॅक्टर हा डावखोरा गोलंदाज आहे.
(७) भारतातर्फे पहिल्या टेस्ट पदार्पणामध्यें शतक करणाऱ्यांची नांवें– (१) सी. के. नायडू. (२) रामचंद. (४३) मांजरेकर (४) बोर्डे.
(८) भारताचा पहिला अधिकृत टेस्ट कप्तान अमरनाथ होता.

**प्रश्न १२ वा–** तुमच्या दृष्टीनें सर्वांत यशस्वी कप्तान कोण ? व कां ?

●●●

**रसिक वाचकांसाठीं ठेवलेल्या**

## आकर्षक योजनेचा निकाल

दीपावली मासिकाच्या वार्षिक अंकांतील कथा, ललित लेख, कविता, रंगीत कलाकृति व व्यंगचित्रें इत्यादि साहित्याबाबत दीपावलीच्या वाचकांची आवड निवड अजमावून नवीन संकल्प साधण्याच्या उद्देशानें 'रसिक वाचकांसाठीं आकर्षक योजना' नोव्हेंबर १९६३ च्या अंकांत आम्ही जाहीर केली होती. त्याप्रमाणें अनेक वाचकांनी ह्यांत सहर्ष भाग घेतला. त्यांच्या या सहकार्याबद्दल आम्ही आभारी आहोत. परंतु वाचकांची मागीदारी अपेक्षेबाहेर अत्यंत निराशाजनक झाली असें खेदानें म्हणावे लागते. त्यामुळें आजचा वाचक निरुत्साही होत चालला आहे कीं काय किंवा साहित्यच मुळीं सकस नसते कीं काय अशी शंकाहि येऊ लागते. कांहीं कां असेना आमच्याकडे एकंदर २८ कूपन्स आली. त्यानुसार खालील प्रमाणें अधिकृत निर्णायक कूपन तयार करण्यांत आले. योजनेचा निकाल कांहीं तांत्रिक अडचणीमुळें जानेवारी ६४ अंकांत देता आला नाहीं, तो येथे देत आहोत.

**अधिकृत निर्णय कूपन**

(१) उत्कृष्ट कथा– **'शपथ'** श्री. अरविंद गोखले, १७ मतें
(२) उत्कृष्ट ललित लेख– **'मी आणि इतर पाळीव प्राणी प्रामुख्याने कुत्रा'** श्री. पु. ल. देशपांडे, १६ मतें.
(३) उत्कृष्ट कविता– **'खाकी'** श्री. कुसुमाग्रज, १६ मतें
(४) उत्कृष्ट रंगीत कलाकृति– **तीर्थरुपा गोदावरी'**, १४ मतें.
(५) उत्कृष्ट व्यंगचित्र– **'गणेश चतुर्थी'** (भारतीय दिव्य महोत्सव.) १४

या अधिकृत निर्णय कूपनशी जुळणारे फक्त एकच भाग्यवान कूपन निघाले. योजनेच्या एकमात्र विजेत्या **सौ. गिरीजा कौर,** के ३६, वेस्ट क्वॉर्टर्स, परळ, मुंबई-१२.




● दिवेलागण ● पराधीन सरस्वती ● व्हराडमाती

दीपावलीकडे अभिप्रायार्थ पुस्तकें पाठवितांना नेहमीं २ प्रति पाठवाव्यांत म्हणजे निश्चित अभिप्राय देणें सोईचें होतें. १ प्रत असल्यास नुसती पोंच दिली जाते.

— संपादक

## अंधारातील वेधवती

**'दिवेलागण'** हा आरती प्रभूंचा दुसरा काव्य-संग्रह. त्यांचा पहिला 'जोगवा.' दोन्ही मौज प्रकाशनातर्फे निघालेले. आरती प्रभूंची काव्य-साधना गेल्या नऊ दहा वर्षांची. गर्भगूढ आशय आणि गर्द गहिरी प्रतिमाने लखलखती आणि लवलवती ठेवणारी त्यांची एक आगळीच आकुल शैली. त्यांच्याकडे बऱ्याचशा कौतुकाने व बऱ्याच अपेक्षेनें पहायला लावणारी. 'जोगवा' चें स्वागत बरें झालें होतें. आतां आरतीचें 'दिवेलागण' समोर आलें आहे. एकुणसाठ (५९) सालापासून तो बासष्ठ (६२) साला-पर्यंतच्या कविता या संग्रहांत समाविष्ट आहेत. सर्वच कवितांतून प्रथमच जाणवणारा विशेष म्हणजे आरतीच्या भावाभिव्यक्तीची प्रसन्नता मात्र त्यांच्या भावप्रतिभा वेग-वेगळचा थरांतून व भाववृत्तींतून प्रकट होतात. काव्याचें माध्यम आरती प्रभू चपखलपणे व सफाईने सहज वापरूं शकतात, एवढें शब्दप्रभुत्व व शब्दयोजनेचें नव निर्माण प्रभूंना साध्य झालें आहे. पण 'जोगवा' आपल्याच आपल्यामध्यें घालून घेतलेल्या मर्यादा ओलांडून आरती प्रभू 'दिवेलागण' मध्यें अधिक पुढें जाऊन मुक्तबंध होतात काय ?...या प्रश्नाचें उत्तर 'दिवेलागण' वाचल्यावर निराशा करणारेंच मिळतें. इवल्या इवल्या शब्दचेटचा कवितांतून प्रभू कलावुती रेखाटीत बसतात तें कांहीं विलक्षण सौंदर्य छटा सहज निर्माण करून जातात. उलट 'अनुप्रासलों मरणें' आणि मी श्वास पेरिले होते' अशा पानपसाऱ्या जंतर मंतर कवितांतून ते एक लोभसवाणी अर्थ व शब्द चमत्कृती व नादलयींची नुपूरमत्त भाव-वलयें साकार करण्याचा हव्यास धरतात...हा अनु प्रासण्याचा व श्वास पेरण्याचा हव्यास आरती प्रभूंचा फार जुनाच आहे व त्यांच्या काव्यांत उमटलेलीं प्रतीकें याच हव्यासांतून स्वतःच स्वतःभोंवतीं फेर धरतात व मग 'दिवेलागण' चें विश्व परिमित व जड होते... कांहीं ओळीच पहाः

**नुस्तें नुस्तें नभ निळें सकाळ सरून**
**नुस्ता तरी पक्षी बसे झाडांत शिरून**
**नुस्ती निळी नदी मागे.....**

आणखी पहाः

**झुळुझुळू झरा जसा हळूहळू तसा**
**माझा खुळपणा वळे दूर जसजसा**

पुनः

**जळत जळत जाणारा जीव**
**नकळत नकळतच रेंगाळतो.....**

माणसांच्या मनाचें प्रभूनिर्मित चित्रण कधीं तिडें, कधीं किडकें, कधीं कटु आणि कधीं हिणकस व्हावें हें आशय घन पार्श्वभूमीच्या अभावीं तुटपुंजे तर वाटतेंच, पण त्यांच्या अनुभूतींचें व चिंतनाचें स्वरूप पण त्यामुळें अस्पष्ट होतें...नादलुब्ध शब्द शैलीचा पदललित छंद साधतां साधतां आशयाच्या क्षीणतेचा व हीनतेचा काटा कुठेंतरी रसिकमनाला सारखा टोंचतच राहतो. क्वचित् मर्ढेकरी उसनवारी तींत भर घालतें आणि... सर्व इच्छांचेंच आतां लिंग होतें. मग आरती प्रभूंनी वस्तःच समर्थतेनें निर्माण केलेलें सौंदर्यक्षम संकेत सुद्धां केविल-वाणे होऊन 'दिवेलागण' होत असतांनाच अंधारांत जाऊन बसतात... अभंगांतील अट्टाहासी काव्यरचना मग केवळ घटपटावी शब्दलीला वाटतात. आरतीप्रभू नकळतच आपल्याच काव्यप्रतिमा नकलून तर काढीत नाहींत ना असें वाटतें. अर्थातच् त्यामुळें पेंच अविकच उकळल्यावर जो कडू तुरटपणा व नकोसेपणा येतो, तोच भाव 'दिवेलागण' चाळल्यावर वाटूं लागतो..वास्तविक आशयाचा अफाटपणा प्रमत्तपणें व्यक्त करण्याचें रूद्र सामर्थ्य आरती प्रभूंच्या लेखणींत निश्चित आहे. असें त्यांच्या 'नातें' सारख्या कविता वाचल्यावर प्रकर्षाने जाणवतें... 'गटाराच्या पाण्याशीं या डोळ्यांचें काय नातें' असे प्रश्न ते टाकतात तेव्हां आपल्या उपरोधाचें वज्र यशस्वीपणें पाजळतात...परंतु अशी एखादीच कविता 'हा हंत हंत' सारख्या शब्द सुभग व नादतरल रचनेंतून जेव्हां मानवी व्यंगावर निष्ठूरपणें नखाग्र खुपसून ते बोट ठेवतात तेव्हां त्यांच्या शब्दसामर्थ्याला पेंग येऊं लागतें व त्यांची रचना 'वांझपणाच्या' कुब्जाकळांनीं कुबडी कण्हूं लागते. प्रभूंनीं आपलाच आपण वेध एकदां घेण्याची वेळ तर आलेली नाहीं ना ?...नाहींतर 'दिवेलागण' होऊनसुद्धां प्रदीप्तीचा इतका अधुरेपणा व अंधुकता चोखंद-ळांना विपण्णपणें जाणवली नसती.

(**दिवेलागणः** कवि–**आरती प्रभु**
प्रकाशक-मौज प्रकाशन गृह, मुंबई ४, किं- रु.)

**–प्र. श्री. नेरूरकर**

●●●

## चिंतनशील साहित्यिक निबंध

**'पराधीन सरस्वती'** हा डॉ. पु. ग. सहस्त्रबुद्धे यांचा तिसरा निबंध संग्रह. साहित्यांतील सनातन पण मूलगामी प्रश्नांची यांत साधक चर्चा आहे.

डॉ. सहस्त्रबुद्धे यांच्या पुस्तकाच्या वाच-काला इतर लेखकांपेक्षा यांतील वेगळेपणा स्पष्ट समजून येईल. गाढा व्यासंग सखोल



अनुक्रमणिका

चिंतन, मुद्देसूद मांडणी, पद्धतशीर प्रतिपादन. स्वमतसिद्धतेसाठीं दिलेली विविध क्षेत्रांतील विपुल उदाहरणे यांचे या ग्रंथात पानोपानी प्रत्यंतर दिसून येईल.

यांतील कोणताहि निबंध पहा. प्राचीन वा अर्वाचीन मराठी साहित्य, इंग्रजी साहित्य, समाज शास्त्र, अर्थशास्त्र, मानसशास्त्र आदि असंख्य प्रांतांतून डॉ. सहस्त्रबुद्धे यांची निरंकुश व अकुतो मय बुद्धी आत्मविश्वासपूर्वक संचार करतांना दिसून येईल. भारत, इंग्लंड, रशिया, अमेरिका, इत्यादि राष्ट्रांतील विविध विचार प्रणालींचा परामर्श घेतांना कोणत्याहि एका पंथाचे, प्रवृत्तीचे वा वादांचे ( Ism ) अंध दास्य त्यांनी पत्करलेले नाही. प्रत्येक प्रश्नाकडे निर्लेप मनाने आणि डोळस बुद्धीने पाहून त्यांनी त्या त्या विषयाचे मूल्यमापन केले आहे.

निबंध रचनेवर राष्ट्ररचना आधारभूत असते असे सांगताना डॉ.सहस्त्रबुद्धे यांनी निबंध प्रकार हळूहळू लुप्त होत आहे यावद्दल हळहळ व्यक्त केली आहे. विचारप्रधानता, तर्कनिष्ठता, व बुद्धीला आवाहन करणे हे निबंध वाङमयाचे प्रमुख गुण निबंधाची आवड नाहीशी होणे म्हणजे पर्यायाने ह्या गुणांचा लोप होणे असेच म्हणावे लागेल. आणि राष्ट्ररचनेच्या दृष्टीनें हेंच फार वाईट आहे.

साहित्यशास्त्रांतील क्रांति, कवीचे काव्यांतील दर्शन, कणिका, क्षणिका, हे तीन लेख प्रामुख्याने नवसाहित्याला धरून आहेत.

नवसाहित्याच्या समर्थनांत आणि नवसमीक्षेत कांहीं नवीन शब्द रूढ आहेत. आत्मनिष्ठा, आशय, आकृति, वाङमयीन प्रामाणिकता, अलिप्तता, स्वतःचे अनुभव आणि त्यांच्याशी प्रामाणिक राहणे. असे विविध शब्द आणि वाक्प्रचार आढळतील. वस्तुतः शब्दांना वुजण्याचे कांहींच कारण नाही. पण शब्दांपेक्षाहि त्यांच्या भोवतालचे वलय इतके मोठे झाले आहे की अखेर पाणी जाऊन निव्वळ 'फेन बुदबुद' तयार व्हावा त्यांतली स्थिती होत आहे. आत्मनिष्ठा व साहित्यिक अनुभव याचा अर्थ स्वतः घेतलेले अनुभव ही कल्पना कशी भ्रामक आहे ते 'साहित्य शास्त्रांतील क्रांति' या लेखांत लेखकाने स्पष्ट केले आहे. खुद्द मर्ढेकरांच्या 'वाङमयीन महात्मता' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत सुद्धा वामन मल्हारांनी असाच आक्षेप घेतला आहे. साहित्यिक अनुभव स्वतःचाच असला पाहिजे तो जसा आला तसाच चित्रित झाला पाहिजे, म्हणजेच तो वास्तववादी ठरतो. हे विचार किती भ्रांतिष्ट आहेत ते यांत दाखवले आहे. वास्तव चित्रण म्हणजे विकृतींचे चित्रण, विकृती हीच मानवी जीवनाची प्रकृती निर्मिती म्हणजे रचनाहीनता, आत्मविष्काराच्या खुळचट कल्पना, या सर्वांमुळें नवसाहित्यांत जो नीरसपणा शुष्कपणा वा रुढाळपणा येत आहे तो दिग्दर्शित केला आहे.

कोणत्याहि लेखनाला साहित्याचा दर्जा कसा प्राप्त होतो वाङमय ही पदवी लेखनाला केव्हा प्राप्त होते हे सांगून कवीचे व्यक्तिमत्त्व, भोवतालच्या जीवनाचा तो काय अन्वयार्थ लावतो आणि त्याचा आविष्कार आपल्या लेखनांत कोणत्या पद्धतीने करतो या वरून काव्यत्व प्रगट होत असते. हे सांगून आधुनिक कवि त्र्यांच्या 'कवीचे काव्यांतील दर्शन' या संबंधीच्या कल्पना कशा विक्षिप्त ( Fantastic आणि मूर्खपणाच्या ( in sane ) आहेत ते त्या निबंधात स्पष्ट केले आहे. कांहींहि पोरकट पांचट, किंवा पोचट लिहिले तरी चालते पण त्यांत एकच पाहिजे—ते म्हणजे प्रामाणिकपणा. आशयाशी इमान. (ते कुठें असतें व कसें दिसते कोण जाणे?) अशा' प्रामाणिकपणा'च्या भांडवलावर काव्याचा कारखाना उभारण्याचा हल्लीच्या कवींचा उद्योग अयोग्य असे डॉ. सहस्त्रबुद्धे यांनीं साधार स्पष्ट केले आह.

कणिका आणि क्षणिका या लेखांत वाङमयापासून राजकारणापर्यंत सर्वत्र एखाद्या कणावर नजर ठेवून तेवढ्यापुरता विचार केल्यामुळें ते लेखन वा ती कृती कशी क्षणजीवी आणि दुर्बल बनते हे दाखविले आहे.

'पराधीन सरस्वती' हा या संग्रहांतील अगदी मार्मिक लेख. प्राचीन वाङमयाच्या काळात सहाशें वर्षाच्या अवधीत वाङमयीन व भौतिक विकास कां झाला नाही? याचे उत्तर ऐहिक सुखसमृद्धीच्या बाबतींत हे लोक उदासीन होते, त्यांची प्रतिभा अगम्याचा अबोध तत्वाचा शोध बोध घेण्यांत गुंतलेली होती, शब्दप्रामाण्य वेदप्रामाण्य गुरूप्रामाण्य मानणाऱ्यांनी बुद्धि प्रामाण्य मानले नाही हाच त्यांच्या सर-स्वतीच्या पराधीनतेचा पुरावा. हाच त्यांचा दोष.

चरित्र ही ललित कृती आहे असे आग्रहाने मांडण्याचा दावा किती फोल आहे हे 'संकराचे अपत्य' या लेखांत स्पष्ट केले आहे. प्रत्येक ललितकृतीत निर्मिती असते आणि चरित्रांत सर्व सत्य घटना निर्लेपपणे मांडायच्या असतात. तेव्हां तिथे निर्मिती होणेंच अशक्य असे डॉक्टर साहेबांचे मत आहे. त्याचप्रमाणे आधुनिक चरित्रांत चरित्र नायकाच्या कर्तृत्वाचे मूल्यमापन किंवा विवरण मुळीच नसते आणि ते नसणे म्हणजे चरित्राचे सर्वस्वच नाहीसे होणे असाहि विचार त्यांनी मांडला आहे.

वास्तवाची अभिरुची या लेखात आपल्या प्राचीन साहित्यिकांपासून तर अगदी डॉ. केतकरांपर्यंत बऱ्याचशा लेखकाची वास्तवावरील पकड शिथिल झाली होती. त्यांना ती आवड मुळातच कमी होती असे दाखवून दिले आहे.

डॉ. सहस्त्रबुद्धे यांच्या पुस्तकाचे हे विहंगमावलोकन आहे. मूल्यमापन नाही. डॉ. सहस्त्रबुद्धे यांची सर्व मते मला जशीच्या तशी मान्य आहेत किंवा तशीच ती इतरांनी मान्य करावीत असाहि माझा आग्रह नाही. नवसाहित्यावरील परीक्षणांत जशी त्यांतील दोषांची त्यांनी कुशाग्रपणे छाननी केली तितक्याच कुशलतेने त्यांना नवसाहित्यांतील गौरवास्पद प्रवृत्तींचे व कलाकृतींचे रसग्रहण करणे अशक्य नव्हते किंबहुना ती दुसरी बाजू देखील तेवढ्याच साक्षेपीपणे पाहिली पाहिजे. संकराचे अपत्य या लेखांत देखील चरित्रांत सर्व सत्य घटनांची नोंद असल्यामुळे त्यांत निर्मितीला वावच नाही अशा स्वरूपाचा त्यांचा विचार मला तितकासा पटलेला नाही.

परन्तु, विचार पटोत वा न पटोत, पण स्वतंत्र विचार स्वच्छ व समर्थ भाषेंत प्रभावीपणें व्यक्त करण्याची डॉ. सहस्त्रबुद्धे यांची शैली अनन्य आहे. हें मात्र निःसंशय सत्य आहे.

**(पराधीन सरस्वती** – लेखक – **डॉ. पु. ग. सहस्त्रबुद्धे** प्रकाशक–कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणें, कि. ५ रु.)

**–श्रीपाद भागवत**

●●●

## बोलभाषेचे हितगूज

मातीच्या बोलींत
मातीचं भजेन

**अमरावतीचे** तरूण कवि श्री. शरश्चंद्र ह्यांच्या 'व्हराडमाती' ह्या वऱ्हाडी बोलीतील काव्यसंग्रह म्हणजे वऱ्हाडच्या काष्टाच्या आणि घामाच्या थेंबातुन व्यक्त झालेले वऱ्हाडी जीवनाचे मधुर व रसाळ बोल आहेत. प्रत्येक पोट भाषेला आपला स्वतःचा असा एक घाट असतो. शब्दांचें लालित्य आणि नादमधुरता त्या मातीच्या मूळ गाभ्यांतुन स्फुरण पावतात. खरें म्हणजे आमची मराठी भाषा रांगडी भाषा म्हणून म्हणतात. परंतु तिच्या पोटभाषा, तिच्या बोलीभाषा इतक्या कर्णमधुर कशा ? हा खरोखरच विचारांत घेतां येण्याजोगा प्रश्न आहे. कोंकणी, वऱ्हाडी, खानदेशी, अशा अनेक बोलीभाषांत नादमधुरता आढळते. त्या त्या बोलीभाषेंतील लोकांच्या ओठावर असलेलीं गीतेंहि ऐकतांना आपणांस जराहि परकेपणा अथवा बुजल्यासारखें होत नाहीं. उलट त्या भाषेंतील माधुर्यानें, तींतील रसाळपणानें आपले कान भारावून जातात. हृदय मोडून जातें. असें कां ? बहिणाबाईच्या खानदेशी ओव्या, अथवा आमच्या कोंकणांतील ग्रामीणगीतें, किंवा वऱ्हाड मातींतील आकाशाकडे ऊंचावून पाहाणारीं हीं गीतांची सूर्यकमळें पाहिलीं कीं हा प्रश्न साहाजिकच आपल्या डोळ्यांसमोर प्रकर्षानें येतो.

ह्या संग्रहांत तीन प्रदीर्घकवनें समाविष्ट करण्यांत आलीं आहेत. (१) व्हराडमाती (२) पान्याचं अभंग, (३) कष्टाचें अभंग, ह्या संग्रहाच्या कवीचा दावा आहे कीं, हा वऱ्हाडी बोलींतील पहिलाच कवितासंग्रह आहे. आणि संग्रहाचे प्रस्तावनाकार व सुप्रसिद्ध विदर्भ कवि श्री. पां. श्रा. गोऱ्हे, कवीचा दावा स्वाभीमानानें स्विकारतात. तेव्हां त्याबाबत अधिक बोलणें नको.

सदर संग्रहातील रचना अगदीं साधी, सोपी, व सुस्पष्ट आहे. कवनांची वृत्तरचना अभंगाची असल्यामुळें साहाजिकच ह्या वृत्ताचा मूळचा साधेपणा त्यांत आलेला आहे. वऱ्हाडी माणसाचा साधाभोळा स्वभाव, त्याची कष्ट उपसण्याची ताकद, त्याला स्वतःच्या काळ्याशार मातीविषयीं वाटणारें विलक्षण प्रेम, वऱ्हाडच्या आकाशांतून तरंगत फिरणारें विविधरंगी मेघ, माळावरील वृक्ष, खळाळणाऱ्या नद्या, झरे, पानें, फुलें ह्या सर्वांविषयीं त्याला विलक्षण जिव्हाळा आहे. श्री. शरश्चंद्रांच्या काव्यपंक्तितून हा जिव्हाळा ह्या तिन्हीं अभंगांच्या चरणांतुन उत्कटतेनें व्यक्त झाला आहे.

काटयानं भारली
भर्दार वाभूय
बुंध्याले हरय
कोम्ब घेत्ये !
(व्हराडमाती)

झाडांत चंदेन
पुस्तेकांत येद
रसांत शहेद
गंगाजय !
(पान्याचं अभंग)

कष्टा कष्टांतला
खरे खोटे पना
काय मी पाव्हना
सांगू बापा ?
(कष्टाचं अभंग)

वरील दिलेल्या तिन्ही कडव्यांतलीं माधुरी तर चाखतां येतेच, परंतु ह्यां तिन्ही कडव्यांत अपरिचीत शब्द आढळत नाहीं. नाहीं म्हणायला 'शहेद' हा शब्द कदाचित कुणाला बुचकळयांत टाकील. परन्तु वस्तुतः ह्या शब्दाचा अर्थ शोधायला तसें फारसें दूर जायलाहि नको. 'शहेद'चा अर्थ मध असा आहे. ज्याप्रमाणें झाडांत चंदनाचें झाड, ग्रंथांत वेद, तसाच रसांत मध, हा ह्या कडव्याचा भावार्थ.

आज नष्ट होवूं लागलेल्या आपल्या महाराष्ट्रांतील वऱ्हाडी बोलीभाषेंत काव्यलेखन करून श्री. शरश्चंद्रानी पुन्हां एकदां नव्यानें आपल्या बोलीभाषेचा ध्वज ऊंचावत ठेवण्याचा जो प्रयत्न केला आहे तो पाहुन खरोखर त्यांचें कौतुक करावेसें वाटतें. त्यांचें आपण अभिनंदन केलें पाहिजे.

(**व्हराडमाती** : कवि–**शरश्चंद्र**, प्रकाशक–**शरश्चंद्र सिंह**, अमरावती.

**––नारायण सुर्वे**

● ● ●

## साभार पोच

**रात्र काळी घागर काळी**
लेखक– चिं. त्र्यं. खानोलकर, प्रकाशक–मौज प्रकाशन, मुंबई-४, मूल्य - रु. ६–५० न. पै.

**खर्डेघाशी**
लेखक– मं. वि. राजाध्यक्ष, प्रकाशक–मौज प्रकाशन, मुंबई ४, मूल्य–रु. ५–००.

**श्री एकनाथ वाङ्मय आणि कार्य** •
लेखक– न. र. फाटक, प्रकाशक–मौज प्रकाशन, मुंबई-४, मूल्य- रु. १०–००.

**मेंदी**
कवियित्री–इंदिरा संत, प्रकाशक–मौज प्रकाशन, मुंबई–४, मूल्य– रु. ३–००.

**माणूस** •
लेखक– मनोहर तल्हार, प्रकाशक–कोठावळे प्रकाशन, मुंबई, मूल्य–रु. १०–००.

**चक्र**
लेखक– जयवंत दळवी, प्रकाशक–कोठावळे प्रकाशन, मुंबई, मूल्य–रु. ५–००.

**असा असावा नवरा**
लेखक– दि. बा. मोकाशी, प्रकाशक–कोठावळे प्रकाशन, मुंबई, मूल्य– रु. ४–००.

**माकडीचा माळ**
लेखक– अण्णाभाऊ साठे, प्रकाशक–कोठावळे प्रकाशन, मुंबई, मूल्य– रु. ४–००.

**पाव आणि मिसळ**
लेखक– न. वि. गाडगीळ, प्रकाशक–पॉप्युलर प्रकाशन, ताडदेव, मुंबई ४, मूल्य–रु. ५–००.

**बाई विना बुवा**
लेखक– उद्धव ज. शेळके, प्रकाशक–पॉप्युलर प्रकाशन, ताडदेव, मुंबई, मूल्य– रु. १०–००.

**वनहंसी**
भाषांतर– मामा वरेरकर, प्रकाशक–साहित्य अकादमी, दिल्ली, मूल्य– रु. २–५० न. पै.

**जेव्हां मी जात चोरली होती**
लेखक– बाबूराव बागुल, प्रकाशक–अभिनव प्रकाशन, मुंबई, मूल्य–रु. ३–००.

**अनवाणी चाल**
लेखक–प्रभाकर नेरुरकर, प्रकाशक–अभिनव प्रकाशन, मुंबई, मूल्य– रु. २–००.

**आनंद लहरी**
कवि- ज. श्री. देशपांडे, प्रकाशक– प्रा. कु. कुसुममाला कोलारकर, नागपूर, मूल्य–रु. ३–५० न. पै.

**विसावा**
लेखक– ल. ना. भावे, प्रकाशक–भारतीय ग्रंथ भवन, मुंबई १४, मूल्य– रु.४–५० न. पै.

**हसल्या आज व्यथा** •
लेखक– राम कृ. जोशी, प्रकाशक–भारतीय ग्रंथ भवन, मुंबई–१४, मूल्य– रु.६–५० न. पै.

●●●

**आवर्त** (पान १० वरून)

व्यक्तीचा चेहरा माझ्या नजरेस पडला आणि मी सचेत झालो. ती तीच स्त्री होती ! हजार माणसांत मी तिला ओळखून काढली असती. इतकी ती मला व्यापून वसली होती. मला पाहतांच लगबगीनें ती पुढें निघालेली पाहून मी पण तिच्या मागोमाग जाऊं लागलो.

ती वरूनच खाली आली होती हें निश्चित होतें. पण मी दयार्णवच्या खोलीत असेस्तोवर कांहीं ती तेथें नहव्ती. मग ती होती तरी कुठें ? मी एव्हांना माझ्या मार्गाला लागलो असेन या समजुतीनें ती जिना उतरून खाली आली होती. मला पाहिल्यावर तिच्या चेहऱ्यावर भीतिची भावना उमटायला दुसरें कांहींच कारण मला दिसत नव्हते. दोन वेळा ती माझ्या नजरेसमोरून वघतांवघतां नाहीशी झाली होती. यावेळी मात्र ती माझ्या कचाटयांत सांपडली होती. तिचा पुरता शोध घेतल्याशिवाय मी तीची पाठ सोडणार नव्हतो. शरीरावर भूल पडावी किंवा एखादा चकवा लागावा तसा मी त्या स्त्रीच्या पाठीमागें जाऊं लागलो. रात्र झाली होती. व प्रकाशांचे झोत मागून पुढून वेगानें येत होते व नाहीसें होत होते. गर्दी मोकाट पसरली होती पण मला मात्र त्या स्त्रीशिवाय कांहींच दिसत नव्हते. माझ्या चोहीकडे दिव्यांचें जणूं जंगल पसरलें आहे असें वाटत होते. प्रकाशाची वर्तुळें छेदून मी चालला होतो व मी मागे आहे याची जाणीव नसलेली ती स्त्री पुढें चालली होती.

तेवढयांत प्रकाशाचा एक प्रखर झोत मला आंधळा करून गेला. क्षणभर अंधाराच्या अथांग डोहांत बुडून गेल्याचा भास मला झाला. त्याहि अवस्थेंत डोळे फाडून पाहाण्याचा मी प्रयत्न केला. पण त्या क्षणार्धांत ती स्त्री नाहीशी झाली होती. ! त्या डोळ दिपविणाऱ्या क्षणानें जणूं तिला आत्मसात करून टाकलें होतें ! समोर पसरलेल्या संध्याकाळच्या गर्दीनें जणूं तिला गिळून टाकलें होतें ! त्या लांबवर पसरलेल्या रस्त्यावर तिला शोधण्याचा मी वेडा प्रयत्न केला व शेवटी हताश होऊन मी माझ्या घराकडे परतलो !

त्यानंतर पांच-सहा दिवस मी भ्रमिष्टावस्थेंतच काढले. त्या स्त्रीची मूर्ति मला ठायींठायीं दिसूं लागली. असें वाटायला लागलें कीं त्या स्त्रीचा व दयाचा संबंध काय आहे हें शोधून काढल्याशिवाय हा मनांतला क्षोभ शमणार नाही. त्या रहस्यमय आवर्ताचा भेद करणें हेंच माझें लक्ष्य बनलें !

एक दिवस अचानक दया क्लबमध्यें आला. तो आला तेव्हा मी खेळत होतो त्यामुळें तो बाजूलाच मित्रांशी बोलत बसला. त्या दिवशी आमचा खेळ खूपच रंगांत आला होता. तो सोडून दयाशी बोलायला जायचें माझ्या जीवावर आलें होतें. म्हणून तो आला तरी मी आपला खेळ चालूच ठेवला होता. दया जरावेळ इतरांशी बोलत बसला व थोडयाच वेळांत तो जायला उठला.

"जातो रे जया. मी येईन पुन्हा केव्हा तरी," तो म्हणाला.

"अच्छा," मी रॅकेट हलवूनच त्याला निरोप दिला.

तो निघून थोडा वेळ झाला असेल तोच कुणी तरी म्हटलं, "या दयार्णवच्या किल्ल्या राहिल्या रे."

"तो रस्त्यावरच असेल अजून," दुसरं कुणीतरी म्हणालं.

"थांबा मी पोचवून येतो त्या," मी म्हणालो. व झटपट किल्ल्या खिशांत टाकून पोशाख केला व धांवतच रस्त्यावर आलो. पण दूरवर नजर फेकूनहि दयाची आकृति माझ्या नजरेस आली नाही. शेवटी त्याला घरीच गांठावं या विचारानें मी लगेच वसने त्याच्याकडे निघालो.

मी जेव्हा त्याच्या घरी पोचलो तेव्हा जवळजवळ नऊ वाजले होते व दया अद्याप आलेला दिसत नव्हता. दयाच्या खोलीचें कुलूप पाहून मनांत अनेकविध विचार येत होते. त्याची खोली उघडावी कीं नाही याचा निश्चित विचार होत नव्हता. दयाचा किल्ल्यांचा झुबका यावेळीं माझ्या खिशांत होता. त्यापैकीं एखादी किल्ली खोलीत असलेल्या ट्रंकेची असणं शक्य होते. त्या ट्रंकेतच दयार्णवचे गूढ दडलेले आहे याची मला मनोमन खात्री वाटत होती. ते गूढ हुडकून काढण्यासाठीं मी आतुर झालो होतो. जास्त विचार करण्यास अवधि नव्हता. अशा संधीसाठी पुन्हा वाट पहाणं निव्वळ मूर्खपणाच झाला असता.

मी इकडे तिकडे पाहून घेतले. मागचा सौध निर्मनुष्य होता. मी पटकन दोन चार किल्ल्या चालवून पाहिल्या. एकीला कुलूप वश होतांच दार उघडून मी आंत शिरतांच दिवा लावला व दार बंद करून त्याला कडी घातली. वाजूच्या स्नानगृहांत कुणी नसल्याची खात्री करून घेतली व धपापत्या अंतःकरणानें त्या मोठ्या थोरल्या पेटीजवळ पोचलो. अधिक उशीर करण्यांत अर्थ नव्हता. दयार्णव कोणत्याहि क्षणाला तेथें येण्याचा संभव होता. तो येण्यापूर्वीच सारं कांहीं आटपायला हवं होतं.

मी त्या पेटीच्या कुलुपाला हात घातला, कुलूप काढलं व झाकण उघडलं. झांकण उघडतांच ते निसटून खाली कसं आपटलं नाहीं याचंच मला नवल वाटलं. माझ्या सर्वांगावरून भीतिची एक लहर खळाळून गेली ! त्या पेटींत अगदी वरच त्या स्त्रीचा फोटो होता. त्या दिवशी चौपाटीवर ज्या तऱ्हेचे हास्य तिच्या चेहऱ्यावर होते, त्याच तऱ्हेचें हास्य त्या फोटोंतहि होते. पण फोटोंतल्या चेहऱ्यांत केवढा जिवन्तपणा होता ! प्रत्यक्षांतल्यापेक्षांहि अधिक ! मी अधिक कांहीं सुगावा सांपडतो कां ते पाहण्यास सुरुवात केली. मागच्याच कप्प्यांत मला कांहीं पत्रं आढळली. प्रत्येक पत्राखाली सही होती, "आपली माधुरी", एकूण दया एकटा नव्हता तर ! त्याचे लग्न सुद्धा झालेले होते ! मग ती स्त्री कोण होती ? कां तीच माधुरी दयाची बायको ! माझें मन प्रचंड आवर्तात सांपडल्यासारखें घुसमटूं लागलें. मी अधाशासारखी ती पत्रं वाचून काढली. दयाची पत्नी बाळंतपणासाठीं माहेरी गेल्यानंतर तिथून तिनें ही पत्र लिहिली होती. किती हळुवार भावना त्या पत्रांतून व्यक्त होत होत्या. अखेरच्या पत्रांत मजकूर होता—

प्रिय,

माझं मन आताशा फार खचत चाललंय. काळजीमुळें प्रकृति फारच ढासळली आहे.








**आपल्याला विसर पडूं नये म्हणून...** यापूर्वीच्या वर्षांत, या दिवशीं, साऱ्या देशभर आनंदोत्सव साजरा होत असे; फटाके व इतर दारूकाम उडवून लोक आपला आनंद व्यक्त करीत; राष्ट्रीय स्वाभिमान रोषणाईच्या झगझगाटानें चमकून उठे! त्या गत वर्षांची आपण आठवण ठेवूं या. आपल्या देशाच्या हक्कांवर त्या वेळीं कोणी हल्ला चढविला नव्हता आणि अमर्याद उल्हासानें आपण हा राष्ट्रीय महोत्सव साजरा करीत असूं. आज, आपण निष्ठापूर्वक या आनंदोत्सवावर मर्यादा घालून घेतली आहे आणि तितक्याच निष्ठेनें आमच्या देशाला एकमुखी पाठींबा देऊन, आमच्या मातृभूमीच्या सीमेवर संकटांना न जुमानतां शौर्यानें त्यांचा सामना करणाऱ्या आमच्या जवानांचें सामर्थ्य वाढवूं या.



मध्य व पश्चिम
रेल्वेंकडून प्रकाशित








( पान ५८ वरून चालू )

डॉक्टरांनीं दोन गर्भ पोटांत वाढत आहेत असं सांगितल्यापासून तर मन फारच हळवं बनले आहेत. पायांत मवूनच गोळे येतात. हात तर सारखें थरथरत असतात. अशा अवस्थेत तुमचं पत्र आलं कीं दिलासा मिळतो. थोडी हिम्मत वाटते. एकदा यांतून सुखरूप सुटका झाली कीं मिळविली. तुम्ही आपल्या मनाला कांहीं लावून घेऊं नका. प्रकृतीला जपून असा. कळावे.

तुमचीच
**माधुरी**

त्या पत्रानें माझ्या नजरेसमोर सारे दृश्य एका क्षणांत साकार केलें. त्या दृश्यांत कल्पनेनेंच वास्तवतेचे रंग भरीत असतांना मागून आवाज आला,

" मित्राच्या खोलीत चोरून शिरणं शोभत नाही तुम्हाला ?"

मी मागें वळून पाहिलें. दारापाशी तीच स्त्री उभी होती ! तिच्या चेहऱ्यावर तेंच तें मंद स्मित होते. अस्फुट पण बोलकें. हळुहळु ती माझ्या दिशेनें येत होती !

तिला पाहून मी क्षणभर चपापलो. त्यावेळी मी ओरडलो कसा नाही, भीतीनें बेशुद्ध कसा झाली नाही याचेंच मला नवल वाटलें. त्या स्त्रीला दाराजवळून येतांना मी पाहिलें होते. दार आंतून बंद करूनच आल्याचे मला पक्के आठवत होते. मग—मग—ही आंत आली कशी ?

" त्-तुम्ही—तुम्ही इथें कशा—आल्या—," मी चांचरत विचारलें. एव्हाना माझ्या शरीराला दरदरून घाम सुटला होता. व भीतीनें हृदय धपापत होते.

" मीसुद्धा तुम्हाला हाच प्रश्न करूं शकते. कशासाठीं तुम्ही ह्यांचे सामान उस्कटत होता ? काय शोधत होतां त्यांत ?" हळूहळू पुढें येत ती म्हणाली व माझ्या बाजूला असलेल्या खुर्चीत बसली !

" क–कांहीं नाही. कांहींच नाही," मी कसेंबसें म्हणालो.

" मला ठाऊक आहे तुम्ही काय शोधत होता ते," माझ्यावर नजर रोखून संथ स्वरांत ती म्हणाली, " मला शोधीत होता तुम्ही, खरं ना ! ह्यांनीं तुम्हाला सारं कांहीं सांगितलं असतं केव्हातरी. तुमच्या-शिवाय जिवाभावाचं दुसरं आहे तरी कोण त्यांना ? पण तुम्हाला त्यांचा विश्वास वाटला नाही. त्यासाठीं तुम्ही मित्राची भूमिका सोडून शर्विलकाची कामगिरी पत्करली. मी कोण आहे हे हुडकून काढण्याची तुम्हाला घाई झाली होती. तुमच्या या अनावश्यक घाईनें तुम्ही काय अनर्थ घडवून आणला आहे, याची तुम्हाला कल्पनासुद्धां नसेल.

बोलतां बोलतां ती थांबली एक दीर्घ उसासा सोडून तिने त्या उघडया ट्रंकेकडे, त्यांतील तिच्या फोटोकडे व अखेर माझ्याकडे नजर टाकली. तिच्या चेहऱ्यावरील हताशता मला स्पष्ट दिसत होती.

क्षणभर थांबून तिनें पुढें बोलण्यास सुरुवात केली.

" मी कोण आहे हें तुम्हाला आतां कळलं आणि माझं येथील वास्तव्य संपुष्टांत आलं. किती प्रयासांनी माझ्या पतीच सान्निध्य मला मिळालं होतं ! तीस दिवसाकरतां कां होईना मला त्यांच्याबरोबर व त्यांना माझ्याबरोबर राहतां आलं असतं. फारा दिवसांनी आमची भेट होत होती. बाळंतपणासाठीं म्हणून मी जी गेलें ती पुन्हा परत न येण्यासाठीं. किती सुखी होतं आमचं वैवाहिक जीवन ! किती अपार प्रेम केलं त्यांनीं माझ्यावर. माझ्या सुखासाठीं त्यांनीं स्वतःचा देह कष्टविला. मला मात्र त्यांना सुख देतां आलं नाही. लग्न झाल्यापासून त्यांनी माझें आजार उपसलें. मी मात्र त्यांचा संसार मधूनच उधळून निघून गेले. "

बोलतां बोलतां माधुरीचा आवाज घोगरा झाला व डोळयांत पाणी उभं झालं. तिच्या बोलण्याने, अपार करूणेनें माझें हृदय भरून आले. तिच्या शेवटच्या वाक्याने मात्र माझ्या अंगावर कांटा उभा राहिला ! माधुरी जर निघून गेली तर मग माझ्यासमोर ही कोण उभी होती ?

माझें मनोगत ओळखून माधुरीच्या चेहऱ्यावर खिन्न हास्य पसरले. ती पुढें म्हणाली. " मी या जगांतून निघून गेले. माझं झिजलेलं शरीर जळून भस्मसात झालं. माझा आत्मा मात्र ह्यांना भेटण्यासाठीं तडफडत होता. कारण अखेरच्या क्षणीं त्यांची भेटसुद्धा होऊं शकली नव्हती ! ती भेट आतां झाली होती. एका अज्ञात शक्तीनें तीस दिवसाकरतां माझ्या आत्म्याला देवरूप दिले व आम्हा उभयतांची भेट घडवून आणली ! या अतर्क्य भेटीसाठीं अट एवढीच घातली कीं ज्यादिवशीं माझें व ह्यांचे हें रहस्य कुणाला कळेल, त्या दिवशी माझ्या आत्म्याचें शरीर गळून पडेल व माझे या जगांतील वास्तव्य संपुष्टांत येईल. तुमच्यामुळें माझ्या येथील वास्तव्याचा अचानक शेवट झाला. नाहीतर अजून दहा दिवस——"

दाटून आलेल्या भावनावेगानें तिला पुढें बोलणेंच अशक्य झालें. मनांत उसळणाऱ्या भावना दडपून टाकण्याचा निष्फळ प्रयत्न करीत ती स्फुंदून स्फुंदून रडूं लागली.

मी मात्र तिच्या या अद्‌भुत वक्तव्यानें हादरून गेलो. कल्पनातीत, अतर्क्य, मानवी शक्तिपलीकडचे असें कांहींतरी त्या लहानशा वास्तूंत घडलें होते; पण त्याचें आकलन बुद्धीला होत नव्हते. जेवढें आकलन झालें तेवढयानेंच मेंदूला मुंग्या आल्या होत्या, सर्वांग बधीर झालं होतं. असं वाटायला लागलं की ही अवस्था जर कांहीं काळ कायम राहिली तर माझें अस्तित्व नष्ट होईल. प्रचंड झंझावात यावा, त्या झंझावातानें आवर्त निर्माण व्हावें व त्या आवर्ताच्या बेफाम गतीपुढें असंख्य झाडे काड् काड् मोडून पडावीत तशी प्रचंड उलथापालथ माझ्यांत होत होती. माझें मन एका विचित्र आवर्तांत सांपडलें होते व त्या आवर्तानें माझ्या विचारांच्या, कल्पनांच्या मर्यादा मोडून टाकल्या होत्या.

" थाड् थाड् थाड् " समोरच्या दारावर मोठयानें आघात झालें व मी केवढयानें दचकलो. माझी नजर खुर्चीत बसलेल्या माधुरीवर व वाजणाऱ्या दारावर आळीपाळीनें वळत होती. काय करावें ते न सुचून हतबुद्ध होऊन मी जागच्याजागीं उभा होतो.

" आंत कोण आहे ! दार उघडा," बाहेरून दया हांका मारीत होता व दार ठोठावत होता.

त्या आवाजानें माधुरी हलली. उठून

अनुक्रमणिका






उभी राहात तिनें दरवाज्याकडे पाहून दीर्घ उसांसा सोडला. माझ्याकडे वळून ती म्हणाली, " मी जाते आतां. तुमचा मित्र आंत येण्यापूर्वी मला येथून गेलें पाहिजे. तुमची आणि माझी भेट झाली, ह्यांचें आणि माझें रहस्य तुम्हाला कळलें आणि त्यामुळें इतःपर आम्हा उभयतांची भेट होणे सर्वथा अशक्य आहे, हें सारं ह्यांना कळतां कामा नये. त्यांची माझी भेट जशी अकल्पित झाली, तसा हा वियोगहि अचानकच झाला अशीच त्यांची समजून झाली पाहिजे. नाहीतर—", ती क्षण भर थांवली. व पुढें म्हणाली, " नाहींतर, भावनाविवशतेच्या एखाद्या क्षणीं ते आत्मघात करून बसतील. यापुढें त्यांना तुमचीच जास्त गरज आहे. जाते मी. "

वोलतांवोलतां माधुरीचा आवाज क्षीण झाला. क्षीण होत होत नाहीसा झाला. व माझ्यासमोर निव्वळ पोकळी उरली. कापूर जळून अखेरीस कांहींच उरूं नये तशी माधुरी लुप्त झाली. माधुरी गेली अन् त्या खोलीत मी एकटाच उरलो. निःसत्व, एकाकी. भांवावलेला.

यांत्रिक पणें मी पुढे झालो व दाराची कडी काढली. दार उघडतांच " तूं होतास होय, मला वाटलं कुणी— " माझ्याकडे आश्चर्यानें पहात दया म्हणाला त्या आरडाओरडीनें व खडखडाटानें जमलेलें लोक आंतून ओळखीचाच चोर निघाला हें पाहून निराश होऊन आपआपल्या खुरांडयाकडे परतले.

त्या गर्दीतून मी वाट काढीत तडक बाहेर पडलो.

" जयंत, असा चाललास कां ? जरा थांव ना, " असें म्हणत दयार्णव माझ्या पाठोपाठ आला पण मी पाठ न वळता तसाच झपाट्यानें जिना उतरून खाली आलो. त्याठिकाणी एक पळभर देखील मला थांबावेसें वाटत नव्हतें. दयाला तोंड दाखवायचीसुद्धा मला हिंमत होत नव्हती. माझ्या हातून नकळत जी चूक घडली होती व एका निरागस आत्म्याच्या सुखावर जो घाला पडला होता, त्याचा मला राहून राहून पश्चाताप होत होता. ' जयंत, थांव ' कुठूनतरी दयाची हांक माझ्या कानावर येत होती. ' तुमच्यामुळें माझ्या येथील वास्तव्याचा शेवट झाला ' माधुरीचा क्षीण आवाज माझ्या कानांत निराशेचे गढत शब्द ओतीत होता.

त्या शब्दापासून दूर पळण्याचा निष्फळ प्रयत्न मी करीत होतो. ●●●




## पंढांचे वाङ्मयीन प्रतिपादन— सारस्वत

**मनोहर** मासिकाच्या नोव्हेंबर व डिसेंबर १९६३ च्या अंकांत 'आजकालच्या मराठी वाङ्मयावर क्ष-किरण !' या शीर्षकाखाली लेखक अशोक शहाणे यांच्या 'वाङ्मय व वांधिलकी' या विचरप्रवर्तक (?) प्रबंधाचा पूर्वार्ध व उत्तरार्ध छापण्यांत आला आहे. पूर्वार्धावर 'विचारप्रवर्तक' असा शेरा देण्यांत आला आहे तर उत्तरार्धाला 'विचार-प्रक्षोभक' असें संबोधण्यांत आलें आहे. हा प्रबंध म्हणे कुठच्या तरी 'संस्कृति मंडळा समोर' मूळ इंग्रजींत लेखकांकडून वाचण्यांत आला. Literature and Commitment ! असा हा मूळ विषय. मराठींतील वाङ्मयाची सध्या काय दशा आहे, ही दशा कां झाली व नव्या पिढीकडून ही परिस्थिति सुधारेल काय या संबंधींचें विवेचन 'वाङ्मय व वांधिलकी' ह्या विषयाच्या चौकटींतच करण्याचा या लेखकानें आरंभींच दावा मांडला आहे. मग लेखक वाङ्मयाची व्याख्या करतो; (कारण धंदेवाईक मंडळीच्या व्याख्याच प्रमाण म्हणून शिक्षक मंडळी पिढ्यान् पिढ्या चालवत आली आहेत. त्या व्याख्या अर्थातच लेखकाला मान्य नाहींत.") 'कसल्याहि प्रकारचें लिखाण' अशी हे लेखक वाङ्मयाची बिनधंदेवाईक व्याख्या करतात !

प्रारंभींच हें सागणें आहे कीं हा तथाकथित प्रबंध प्रारंभापासून अखेरपर्यंत वाचणें ही एक वैचारिक करमणूक आहे व एखाद्यास तसें वाटलेंच तर त्याला प्रक्षुब्ध करण्याचें खोडकर आणि वेडसर सामर्थ्य या प्रबंधाच्या समग्र बांधणींत (कीं बांधिलकींत) पुरून उरेल एवढें आहे. हा प्रकांड (?) प्रबंध लिहीण्याचा मनोव्यापार हा कुणा एका 'शहाण्याचा' केवळ आत्मघातकी वेडेपणा नसावा. या वेडेपणालां एक पद्धति पण आहे; आणि या पद्धतीचा पुरस्कार करणारी आडून किंवा दडून राहिलेली कुणी हितेच्छू मंडळी पण असली पाहिजे. ती असो.

केवळ 'कसल्याहि प्रकारचें लिखाण' केवळ स्वतःला प्रकट करणें' या वृत्तींतून 'लेखकाचें व्यक्तिवैशिष्टच अबाध' ठेवलें असें प्रस्तुत प्रबंधकराचें म्हणणे मान्य केलें तर सहजच त्यांनी हा प्रबंध लिहून ('कसल्याहि प्रकारचें लेखन') आपलें 'व्यक्तिवैशिष्टच' मात्र 'अबाध' राखलें आहे असें निक्षून म्हणतां येईल. हे शहाणे नेहमी आपल्या पिढीचा उल्लेख आवर्जून करतात. त्यांच्यापिढीबद्दल आपण नंतर बोलूंच.

आतां 'बांधिलकी' ! त्याचें म्हणणें, 'बांधिलकी ही स्वतःखेरीज दुसऱ्या कशाशीं तरीच असायला हवी.' मग बांधिलकीशीं जोडल्या गेलेल्या गोष्टींची ते मोजदाद करतात. त्यासाठीं ते गेल्या पिढींतील (?) आल्बर्ट कामूचा आधार देतात. गंमत अशी आहे कीं पाश्चात्य देशांतील कामूपासून तो काफ्कापर्यंत नानाविध नांवें या प्रबंधाकारांनी मोठ्या मजेदार रीतीने आपल्या प्रबंधांत गुंफिली आहेत किंवा गुंतविली आहेत. हीं नांवें सरळ एका रेषेंत किंवा एकाखालीं एक लिहीतील तर एका नवकवनाचा जन्मच व्हायचा ! ही सर्वच नांवें फार मोठी आहेत. सूचक आहेत. प्रचंड आहेत व पराक्रमाशी व पौरुषांशीं त्यांचा वास्तविक संबंध आहे. शहाणे आपल्याला त्यांच्या पिढीचे म्हणवतात किंवा त्यांना आपल्या पिढीचे मानतात. या नांवांची त्यानी स्वामी अगेहानंद भारती व सुधीन







दत्त या नांवाशी सांगड घातली आहे.

तर अशी ही यांची पिढी. 'पिढी'बद्दल लेखकांचे म्हणणें असे आहे..., पिढी म्हणजे विशिष्ट कालखंडांतील एकाच वयोमानाचीं माणसें नाहींत. निव्वळच समकालीनाची पिढी बनत नाही. तर ऑर्तेगा (Ortega) पासून उसनवारी करायची झाल्यास ते समवृत्तीचे असावे लागतात. त्या त्या काळच्या एकत्रित आयुष्य क्रमांत समवृत्तीनें जगणाऱ्यांचीच पिढी बनते..' प्रबंधकार पुढें म्हणतात कीं 'त्यांच्या' अगोदर जन्माला आले एवढाच ज्यांचा गुण त्यांना धड पिढीहि बनवतां आली नाही 'ते निव्वळच टोळीवाले.' वाचकहो, येथें तुम्ही टाळी द्याच! तुम्हांला हा विचार तर मग समजला कां ?...

कारण या प्रबंधांत तसेंच पाहिलें तर शेवटी उरते उसनवारीच. पण या उसनवारीची दखल आपण घेतली पाहिजे.

(१) एक तर 'आमची पिढी ही पंढांची पिढी आहे' असें त्यांनीं पूर्वीच जाहिर केलें आहे म्हणे.

(२) दुसरें म्हणजे 'कोणतीहि कल्पना मनांत धरून त्याप्रमाणें आयुष्य नेतूं पाहणें ही गोष्ट 'त्यांना' उबग आणणारी आहे.

(३) तिसरें असें कीं वाङमयाच्या प्रांतांत आपण मोठेंसें कांहीं केलें आहे असा 'त्यांचा' मुळीच दावा नाही.

(४) चौथें म्हटलें म्हणजे भागवत. पंथांतल्या सगळयाच संतांपासून तो राजेंद्रसिंग वेदी पर्यंत व कीर्केगार्डे, नीत्शेपासून तो टेनेसी विल्यम्स, पास्तर नॅक पर्यंत-- तमाम मंडळीचा त्यांना मोठा आधार वाटतो. हें त्यांचें जग आहे. ह्यांतल्या कुणालाहि यादींतून वगळलें तर ह्या जगांत पोकळी तयार होते म्हणे...

(५) पांचवें पण शेवटचें नव्हें...अत्यंत थोडकें जें त्यांचें लिखाण तें म्हणजे निव्वळ जगण्यांतला उत्साह व आनंद दाखवण्याचा प्रयत्न होता...जोरदारपणें कांहीं करत राहावें असें त्यांना कधींच वाटलें नाहीं, हें मात्र खरें आहे. असें ते नम्रपणें म्हणतात...

असें हें एकूण या पंढांचें प्रतिपादन आहे.

शेवटीं कुणाचा कांहीं संशय राहिला असेल तर घालवण्याचा प्रयत्न म्हणून या प्रबंधकारानें दोस्तोयेव्हस्कीच्या लिखाणांतला उतारा दिला आहे.

या पंढांच्या प्रतिनिधी प्रबंधकारानें मराठी वाङमयाचा आढावा घेतला आहे, त्याचा मागोवा आपण जरा सबूरीनें घेऊं. पण वर जो कांहीं प्रकार त्यांच्याबतीनें ठेवण्यांत आला आहे, तो आपण या प्रबंधकाराचा 'थिसिस' म्हणून वरवर विचारांत घेऊं. कारण तसें आंत खोलवर बुडी मारण्यासारखें त्यांत कांहींच नाहीं. हें उघड आहे. पंढांचें आणखी खोडून व खोलून पहावयाचें तरी काय ? आणि कां म्हणून ?

परिस्थिति अत्यंत वेदनादायक आहे असें यांचें म्हणणे कां ? तर आल्बेर कामूने तसें म्हणून ठेवलें म्हणून. आल्बर्ट कामू स्वतःशी अत्यंत प्रामाणिक होता; कारण दुसऱ्यामहायुद्धाच्या काळांत आणि नंतर हिटलरी आसुरी वृत्तींचें हलाहल तो प्याला होता. तें पचवून मानवी मूल्यांच्या संरक्षणासाठीं तो लढला होता. कुठें कामूची ही क्रियाशील वृत्ति आणि कुठें क्रियाशून्य व मुष्टिमैथूनांत रमणारी या पंढांची किडकी नासकी विकृत शरीरयष्टी !... आणि हे म्हणे समवृत्तीचे...म्हणून यांच्या पिढीचे !...बिचारा कामू मरून गेला म्हणून बरें झालें : त्याच्या कानीं हें वृत्त गेलें असतें तर कदाचित् त्याच्यावर पुनः मरण्याची पाळी निश्चितच येती !.... डोस्टोयव्हस्की...ज्याने झारचें मृत्यूचें आवाहन स्वीकारलें; पीटर्सबर्गच्या थंडींत अनवाणी पायांनीं व तोंडावर पोतें टाकलेल्या अवस्थेंत कोणत्याहि क्षणाला मृत्यूची मिठी पडते याची वाट पहात, पोल्याच्या एका छिद्रांतून सान्तांतून पार अनंतीकडे झेप घेऊन 'गुह्यात् गुह्यतरम्' अशा गूढ अनुभूतीची प्रचीति ज्याने 'याचि देहीं याचि डोळां घेतली' तो म्हणे यांच्या पिढीचा ! समवृत्तीचा...किंवा हे पंढ त्याच्या पिढीचे. या पंढांनीं देशांतील स्वातंत्र्य संगर तर सोडूनच द्या. पण कधीं काल परवा पर्यंत भीषण रीतीनें चाललेल्या व ब्रॅगंझा टी कुन्हा पासून तो मार्क फर्नांडिस पर्यंतच्या व बाबू घडवडे पासून तो बाळा मापारी यांच्या रक्तानें रंगलेल्या गोवा मुक्ति-संग्रामांची तरी किंचित् दखल घेतली होती काय?... पोर्तुगीज फॅसिस्टांच्या राजवटीला हुसकून लावण्यासाठीं कधीं पोर्तुगीज फॅसिस्टांचें यांना दर्शन तरी घडलें होतें काय ?...ज्यांचें जीवन पौरुषमय त्यांना आपण 'पंढपणें' पंढांतच ओढतो आहांत याची बाबा, पंढानो, जर तुम्हांला जाणीव होत नसेल (आणि ती पंढांना कशी होणार ?) तर तुम्हीं त्यांच्यावर मलतेच नपुंसक अत्याचार त्यांच्या अपरोक्ष करून राहिला आहांत हें खरें नाही काय ?...

म्हणे 'युरोपमधल्या त्याच काळच्या एका व्यक्तीचा उल्लेख केला कीं आगरकरांचा (व अर्थातच् लो. टिळकांचा पण) बौद्धिक दळिद्रपणा फारच डळडळीत होतो." व ही व्यक्ति म्हणजे म्हणे 'नीत्शे...'

नीत्शेचें तत्त्वज्ञान हें प्रकट रीत्याच पाशवी तत्त्वनिष्ठेवर व सत्यदुष्ट हिंसक विकृतीवर आधारलेलें खुनशी व फॅसिस्ट ! हिटलरच्या नाझी तत्त्वज्ञानाचा व राजकारणाचा प्राण म्हणजे हा नीत्शे. जो एके ठिकाणीं म्हणतो... (भगिनींनो, इकडे नीट लक्ष द्या बरं)

'If you go to a woman, do not forget to take your whip.'

या नीत्शेबरोबरच घालता येईल असा एझरा पौंड..फॅसिस्ट प्रतिगामी प्रवृत्तींचा बुद्धिभ्रंशतेचा झटका येणारा रोगट मनुष्य...

ही म्हणे यांची पिढी ! आणि हे म्हणे या पिढींतील. मुंबईंत आजकाल सर्वत्र स्वैर रीतीनें वांगडबिगा घालणाऱ्या हिजड्यांच्या पिढीनें आपणच स्त्रीत्वाचें आणि घरंदाज शालीनतेचें प्रतिनिधित्व बेढब नखरेलपणाने करण्यासारखेंच हें या 'पंढांचें' पण करणें म्हणतां येईल.

आणि मराठी वाङमयाकडे जेव्हां हे पंढ वळतात तेव्हां सिंहसदृश पौरुषत्वाचें ज्यांचें पिंड, त्यांना ते फिदीफिदी आणि खुदूखुदू हंसून (पाचकन्) नाकें मुरडतात. (आणखी मुरडण्यासारखें त्यांच्याजवळ असणार आहे तरी काय ?...)







'त्या काळच्या बुद्धीच्या दारिद्र्याची ठळक निशाणी म्हणून द्यावयाचें उदाहरण ते टिळक-आगरकर या जोडीचे देतात. हा गृहस्थ... म्हणजे टिळक...हा अत्यंत व्यवहारी......हे म्हणे गीतेवर भाष्य लिहू धजले...'...त्यावेळच्या सामाजिक–राजकीय व तात्त्विक मनोभूमिकेला असंबद्धपणे व संदर्भ तोडून पहावयाचें व मग आपणाला परम सत्याचा साक्षात्कार होत आहे. अशा प्रेषिताच्या ढंगांत पण नपुंसकपणें नतद्रष्ट बोलावयाचें हा या षंढांचा तृतीयपंथीं खाक्या ! ...हरिभाऊ आपटे, गडकरी, बी. केशवसुत यांच्यावर पण पाचकन् थुंकण्यांत षंढें प्रामाणिक रहातात. पण आश्चर्य वाटतें त्यांनीं केलेली मर्ढेकरांची चिकित्सा वाचून... 'सर्व तक्रारी करून' देखील हे गृहस्थ उजळ माथ्याने देशांतील औद्योगिक शहरांतूनच राहात गेले... असें त्यांच्याबद्दल या षंढांचें म्हणणे...!

या षंढांचें म्हणणे किती किती म्हणून सांगायचें !

बावानो...(अर्थात् या विचार-प्रक्षोभक निबंध प्रसरणाऱ्या..(षंढांना प्रसवशक्ति असते काय ?) पिढीच्या प्रतिनिधींना उद्देशून) जर तुम्हीं म्हणतां कीं मर्ढेकर हा गृहस्थ 'रेडिओंत अन् राधाक्रिइन' लिहून देखील थेट मरण ओढवेपर्यंत ऑल इंडिया रेडिओची चाकरी करीत राहीले...हा खोटारडेपणा त्यांचा ! ...त्यांच्या लेखनाचा ! ! ..

मग आपण, पण बावांनो, असाच खोटारडेपणा आपल्या लेखनांतून व जगण्यांतूनहि करीत आहांतच कीं ! ....

परिस्थिति अत्यंत वेदनादायक आहे. या परिस्थितींतून तगून जाण्याचें सामर्थ्य ज्यांच्यांत नव्हतें त्यांना आत्महत्या करावी लागली असें आपण आक्रंदून उल्लेखितां ?...

...तर मग तुम्हां पिढींत हें तगून जाण्याचें सामर्थ्य आहे असें तुम्हांस वाटतें काय ?...

अन्यथा खोटारडेपणा टाळण्यासाठीं.. (आणि तो शक्य तितक्या लवकर टाळणें तुम्हांला आतां क्रमप्राप्त झालें आहे..) तुम्ही पण त्याच मार्गानें जायचें अजून कां बरें टाळीत आहांत ?

...तर मग तुम्हीच सांगितलेल्या कसोटीलाहि तुमचें लिखाण उतरत नाहीं, तर बाबांनों, तुमचें लिखाण म्हणजे आहे तरी काय हें सांगण्याची मेहरबानी. ..(नको...'कराल काय ?' हें विचारून तरी काय उपयोग ?)

●●●

# श्री. नाईकांची यशस्वी माघार

**जानेवारीच्या** पहिल्या तारखेस महाराष्ट्राचे मुत्सद्दी व कर्तबगार मुख्यमंत्री श्री. वसंतराव नाईक ह्यांनीं महाराष्ट्रांतल्या दारुबंदीबाबतचे जे नवें धोरण जाहिर केले त्याबद्दल आम्हीं त्यांचे अभिनंदन करतो. हें धोरण जाहीर करतांना त्यांनी दाखवलेली व्यवहार्य दूरदृष्टी व हितसंबंधियांच्या विरोधी बावटळीला तोंड देण्याची त्यांची धडाडी निस्संशय प्रशंसनीय ठरली आहे. दारुबंदीच्या कायद्यामुळें गेल्या एक तपांत वाढलेली गुन्हेगारीची दहशत, हातभट्ट्यांचे बेसुमार पीक व त्याचा सार्वत्रिक उपद्रव आणि अंमलबजावणीची हास्यास्पद उपाययोजना व तदनुषंगाने बेसुमार वाढलेलें इतर अनाचार ह्यांनी सर्वसामान्य जनता त्रस्त होऊन गेली होती. संसदेत, विधीमंडळांत तसेच न्यायालयांत ह्या मोहिमेचे तीनतेरा वाजूनहि केवळ कांहीं तथाकथित सोवळ्या नेत्यांच्या प्रतिष्ठेसाठीं ह्या अव्यवहार्य व उपद्रवी मोहिमेला राबवण्याची सक्ती राज्यसरकारांवर करण्यांत आली होती. तिची निरर्थकता व खर्चिक योजकता दृष्टोत्पत्तीस येऊनहि तिच्याविरुद्ध ब्र काढण्यास पक्षानुयायांसहि जिथे बंदी होती तिथे राज्यारूढ सरकारने कोणतीहि ढिलाईची प्रतिकूल योजना विचारांत घेणेहि आजपर्यंत साध्य झाले नव्हतें. श्री. नाईकांनीं आपल्या कारकिर्दीच्या आरंभीच हे मनोधैर्य दाखवून आपला राज्यकारभार खरोखरी व्यवहार्य व सर्वहितकारक ठरेल असे पटवून देऊन तमाम जनतेला दिलासा दिला आहे.

ही योजना जाहिर होतांच त्यावर अनुकूल व प्रतिकूल टीकेचा मारा सुरूं होणें अपेक्षितच होतें. प्रतिकूल टीकाकारांनीं आपल्या निरर्गल टीकेनें, सत्याग्रह उपासतापासांच्या धमक्यांनीं मुख्यमंत्र्यांच्या ह्या पावित्र्यविडंबनाच्या योजनेविरुद्ध निषेधाचा जो गदारोळ उठविला आहे तोहि अविवेकी व ढोंगी स्वार्थासाठीं आहे असें म्हणणे प्राप्त ठरते. श्री. नाईकांनीं जाहिर केलेल्या सवलतीमुळें मद्यार्कांची सरकारी पातळीवर जी निर्मिति व विक्री होणार होती तिच्यामुळें सरकारचा जसा आर्थिक लाभ झाला असता तसाच अनिष्ट व अपायकारक पेयांच्या प्रचलित खुल्या विक्रीलाहि पायबंद बसला असता. ताडीबंदीनें बेकार झालेल्या भंडाऱ्यांना व्यवसाय मिळाला असता, माडांची निपजहि वाढीस लागून वृक्षारोपणाच्या कार्यक्रमालाहि इष्ट वळण लागले असते, द्राक्षमळ्यांना व उंस कारखान्यांना इष्ट प्रकारच्या मद्यार्कांच्या निर्मितीसाठीं आपापला व्याप वाढवतां येऊन निर्यातीलाहि उत्तेजन मिळालें असतें आणि दारुबंदीच्या अंमलासाठीं होणारा बेसुमार, खर्च कमी होऊन मद्यार्कांवरच्या कराने आणि निर्मितीने होणारे उत्पन्न शिक्षण व इतर सामाजिक सुधारणांवर सढळपणें खर्च करतां येऊन राज्याची सर्वांगीण प्रगती अल्पकाळांतच साध्य झाली असती. श्री. नाईकांचे धोरण समर्थनीय व हितकारक असल्यामुळें दक्षिणभारतांतल्या इतर राज्यकर्त्यांनीहि आपल्या राज्यांतल्या दारूबंदीचा फेरविचार जाहीरहि केला होता.

भुवनेश्वरच्या कॉंग्रेसच्या अधिवेशनांत महाराष्ट्र राज्याच्या ह्या निधड्या व सर्वलक्षी धोरणाचा दुस्वास करणाऱ्या तथाकथित पक्षीय बुजुर्गांनीं कॉंग्रेसचे नूतन अध्यक्ष श्री. कामराज ह्यांचे कान फुंकून आपल्या जेष्ठत्वाचे वजन खर्च करून पक्षसभेंत विरोधाचा शिमगा केला. अध्यक्षांनीं आपली व त्यांची बूज राखण्यासाठीं श्री. नाईकांना सबुरीची समजावणी दिली. एकाकी नाईकांनीं 'सर्व नाशे समुत्पन्ने' ही उक्ति स्मरून ह्या बावटळींत मुखलेप लावून मुत्सद्दीगिरीनें अर्धाचा त्याग करण्याचे धोरण मान्य केलें. पहिलें

**देशावरचें संकट अजून टळलेलें नाही. यासाठीं आपल्या निर्धाराची, आत्मबलाची देशाला आज अत्यंत गरज आहे ... !**

अनुक्रमणिका

घोरण जाहिर झाल्यानंतर दहा दिवसांच्या आंतच झालेल्या ह्या लगामबंदी पुनर्विचारानें उत्साही जनता निराश झाली हें तदनंतरच्या टीकेनें प्रत्ययास आलें. श्री. नाईकांची ही माघार म्याडपणाची आहे असे वावदूक टीकाकारांचे मत असलें तरि प्राप्त परिस्थितींत त्यांच्यासारख्या सूज्ञ, मुत्सद्दी, व कनिष्ठ गणल्या गेलेल्या राज्याच्या मुख्यमंत्र्याला तद्वत् वर्तन करणे अपरिहार्यच होते हे विचारांतीं कोणालाहि पटेल. टेकचंद कमिटीच्या अहवालापर्यंत थांबण्याची त्यांनी मान्यता दर्शविलेली आहे. त्यानंतरचे त्यांचे धोरण कसे राहील ह्यावद्दल आजचा निष्कर्ष काढणें अप्रस्तुत ठरतें. प्रस्तुत अधिवेशनांच्या समयीं नेहरूंच्या अचानक अस्वास्थ्यामुळे ही कोल्हेकुई करण्यास संधिसाधूंना सवड मिळाली. कदाचित् नेहरू प्रस्तुत बैठकीस उपस्थित असते तर नाईकांना आपली रास्त बाजू मांडण्यास संधी मिळून अनुकूल न्यायहि मिळाला असता. तूर्त तरि ते जरि स्वस्थ बसले आहेत तरि इष्ट संधी प्राप्त होतांच आपली स्वाभाविक निर्भीड धडाडी ते पुन्हां प्रगट करतील ह्यांत संदेह नाहीं. महाराष्ट्र राज्याच्या ह्या खंद्या व दूरदृष्टी मुख्य मंत्र्यांचे आम्हीं पुन्हां एकदां अभिनंदन करतो.

●●●

## बालगंधर्वांचा अमृतमहोत्सव

**गेल्या** वर्षीच्या जून महिन्यांत मराठी रंगभूमीच्या सुवर्ण युगाचे शिल्पकार नटसम्राट श्री. नारायण श्रीपाद राजहंस उर्फ बालगंधर्व ह्यांच्या वयाला पंचाहत्तर वर्षे पूर्ण झालीं. ह्या सुमंगल घटनेनिमित्त व मराठी रंगभूमीच्या त्यांनीं केलेल्या एकनिष्ठ व नेत्रदीपक सेवेबद्दल मराठी नाट्य परिषदेनें चालू महिन्याच्या दोन तारखेपासून ते आठ तारखेपर्यंत त्यांचा अमृतमहोत्सव साजरा करण्याचे योजिले आहे. प्रस्तुत महोत्सवांत मराठी रंगभूमीला ललामभूत ठरलेल्या ह्या गुणी तपोवृद्ध व वयोवृद्ध कलावंतांचा सत्कार करण्याचे ठरवून मराठी नाट्यरसिकांनीं त्यांच्या चरणीं आपली कृतज्ञता व्यक्त करण्याचा सुयोग साधला आहे. पूर्ववयांत बालगंधर्वांनीं मराठी रंगभूमीला भरजरी ऐश्वर्य प्राप्त करून दिलें. संगीत, नाट्य व नेपथ्य ह्याबाबतींत महाराष्ट्रीय रंगभूमीवर त्यांनीं केलेलें उपक्रम इतर भाषिक व प्रांतीय रंगभूमीच्या रसिकांनींहि अक्षरशः शिरोधार्य मानले. रसिकांनीं त्यांचे जे कोडकौतुक केलें त्याचे पुरेपुर माप त्यांनीं आपल्या चतुरस्त्र कर्तृत्वाने श्रोत्यांना रंजवून त्यांच्या पदरांत घातलें मराठी रंगभूमीवर नवीन प्रयोगांचे उपक्रम सुरू झाल्यानंतरहि व विशेषतः स्त्रियांनीं रंगभूमीवर पदार्पण करून स्वाभाविक अभिनयाच्या वैशिष्ट्याची जोड दिल्यानंतरहि बालगंधर्वांची लोकप्रियता बराच काळ ओसरली नाही ह्यांतच त्यांच्या यशाचे व कर्तृत्वाचे खरे गमक आहे. उतारवयामुळें निवृत्त झाल्यानंतर व त्यांची नाटकमंडळी दुर्दैवानें विपत्तीच्या फेऱ्यांत सांपडल्यानंतर व्यक्तिशः त्यांना असह्य मानहानी सहन करावी लागून उपेक्षित अवस्थेत जीवन कंठावें लागलें. तरिसुद्धां भजन व मैफलींच्याकार्यक्रमांनीं त्यांनीं दुर्बल व विपन्नावस्थेंत आजपर्यंत रसिकांची सेवा करण्यांत कुचराई केली नाही. अशा ह्या थोर नटश्रेष्ठाचा व गायनगंधर्वाचा सत्कार उशिरां कां होईना पण होत आहे हे इष्टच आहे. बालगंधर्वाची स्मृति चिरंतन राहावी म्हणून मराठी रंगभूमीवरील श्रेष्ठ गायकनटास प्रतिवर्षी एक सुवर्णपदक देण्याचा उपक्रमहि ह्या सत्कारसमारोहापासून सुरूं होणार असून कोल्हापूरच्या शाहू महाराजांनीं त्यासाठीं मराठी नाट्यपरिषदेस दहा हजार रुपयांची देणगी दिली आहे. गेल्या महिन्याच्या एकोणीस तारखेस तिसऱ्या महाराष्ट्र राज्य नाट्यमहोत्सवाचा पारितोषिक वितरण समारंभ बालगंधर्वांच्या हस्तें साजरा होऊन महाराष्ट्र सरकारतर्फे त्यांचा सत्कार करण्यांत आला हेहि उचितच झाले. मुंबईची महानगरपालिकाहि त्यांचा भव्य सत्कार आयोजिणार आहे ही आनंददायी वार्ता आहे. श्री. बालगंधर्वांना आम्हीहि नम्र अभिवादन करतों व त्यांच्या अमृतमहोत्सवाबद्दल त्यांचे अभिनंदन करून त्यांना दीर्घायुरारोग्य प्राप्त होवो अशी सदिच्छा व्यक्त करतों.

●●●

**भारताच्या संरक्षणासाठीं आपल्या रक्ताची, श्रमाची आणि धनाची अत्यंत जरुरी आहे— ते अविलंब द्या.**

## सिन्नरच्या एका लोकहितैषींचे निधन

**सिन्नरच्या** प्रसिद्ध वस्तीराम नारायणदास महेश्वी विडी उद्योगधंद्याचे संस्थापक व अध्वर्यु श्री. वस्तीरामजी यांचे डिसेंबर महिन्याच्या १९ तारखेला आकस्मिक देहावसान झाले.

श्री. वस्तीरामजी हे आरंभीपासूनच सात्विक, धर्मभीरु व सोज्वळ मनाचे होते, लोकसेवा आपल्या हातून घडावी ही त्यांची मनापासूनची इच्छा. जेव्हां केव्हां जनताजनार्दनाची सेवा करण्याची संधी मिळे तेव्हां तेव्हां ते कुठल्याहि परिस्थितीत सिद्ध राहिले नाही असें कधी झालेच नाही. विडी उद्योगापासून असंख्य लोकांच्या गरजा भागू शकतात व त्यावर हजारो लोकांची पोटं जगूं शकतात तर ते लोकसेवेचे कार्य कां हाती घेऊ नये ? ह्याची जाणीव होताच त्यांनी सिन्नरच्या परिसरांत एक मोठा विडी उद्योग सुरूं केला. आज शेकडो लोक त्यावर जगत आहेत. ते खरोखर एक साधु पुरुष होते. त्यांच्या विनयशील व प्रेमळ स्वभावाची प्रचिति नाशिक व सिन्नरच्या रहिवाशांना खासच परिचित आहे. त्यांचा गुणग्राहकता स्वभाव तर सर्वश्रुत आहेच.

श्री. वस्तीरामजी व त्यांचे कुटुंब दीपावलीकडे नेहमीच आस्थेने पहात असतात. दीपावलीचे ते एक हितचिंतक होते. त्यांच्या निधनाने त्यांचे सुपुत्र श्री. देवकिसनजी व परिवारांस झालेल्या दुःखांत आम्ही सहभागी आहोत.

# पत्रकार फाटकांचे अभिनंदन

**गेल्या** महिन्याच्या सहा तारखेला मुंबईच्या पत्रकारांनीं मराठी पत्रकारदिन साजरा केला. ६ जानेवारी १८३२ रोजीं कै. बाळशास्त्री जांभेकर ह्यांनीं पहिलें मराठी वृत्तपत्र 'दर्पण' सुरू केलें व तिथूनच मराठी पत्रकारित्वास सुरवात झाली म्हणून हा दिन सर्वत्र पाळला जावा असा मराठी पत्रकार परिषदेनें आदेश दिला होता व त्यानुसार तो साजरा करतांना मराठी पत्रकार संघाचे संस्थापक व ज्येष्ट वृत्तपत्रकार प्रा. न. र. फाटक ह्यांचा पत्रव्यवसायांतल्या त्यांच्या दीर्घ सेवेबद्दल सत्कार करण्यांत आला. १९२३ सालीं प्रा. फाटकांनीं वृत्तपत्रीय पेशा स्वीकारला. 'इंदुप्रकाश' पत्रांत दाखल होण्यापूर्वी विविधज्ञानविस्तारांत त्यांनीं लेखन केलें होते.' 'इंदुप्रकाश' पासून ते 'नवाकाळ' सोडीपर्यंत एक तप त्यांचे हें पत्रकारित्व सुरू होतें. प्रस्तुत पत्रांत आपल्या समर्थ व साक्षेपी लेखनानें ह्या पत्रांना त्यांनीं एक वैशिष्टपूर्ण दर्जा प्राप्त करून दिला. आपल्या परखड टीकालेखांनीं व विवेचक अग्रलेखांनीं फाटकांनीं तत्कालीन, राजकीय व सामाजिक प्रश्नांची व मोंदूगिरीची चिरफाड केली व उथळ आणि गिलावा लावलेल्या विद्वत्तेचीहि पगडी उडविली. विविधवृत्त, विविधज्ञानविस्तार, प्रकाश, मौज, आलमगीर ह्या व इतर नियतकालिकांत त्यांनीं केलेल्या लेखनाची सूचीत करूं म्हटलें तरि तो एक जाडजूड ग्रंथ होईल. प्रा. फाटकांचे ग्रंथस्वरूप लेखन मूर्तिभंजक असून ही त्यांच्या सप्रमाण ऐतिहासिक व तात्विक समीक्षणपद्धतीमुळें ते विचारार्ह ठरलेले आहे, रानडे चरित्र, ज्ञानेश्वर, एकनाथ व रामदास ह्यांच्या चरित्रांचे व वाङमयाचे विवेचन करणारे ग्रंथ, अठराशें सत्तावनची शिपाई गर्दी, ह्या त्यांच्या ग्रंथांनीं मराठी वाङमयांत मोलाची भर टाकली आहे. भारत इतिहास संशोधन मंडळ, प्राज्ञपाठशाला, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई मराठी साहित्य संघ महाराष्ट्र साहित्य परिषद व महाराष्ट्र ग्रंथालय संघ इत्यादि विविध कार्य करणाऱ्या संस्थांना प्रा. फाटकांचे नेतृत्व व सहकार्य लाभलेले आहे. मराठी पत्रकार परिषदेचे तसेच मराठी साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष झाले होते. चालू महिन्यांत गोव्यांत भरणाऱ्या मराठी ग्रंथालय परिषदेचेहि ते अध्यक्ष नियुक्त झाले हे एकप्रकारें उचितच झालें आहे. त्यांच्या अभ्यासिकेचा कानाकोपरा अनेक दुर्मिळ व मौल्यवान ग्रंथांनीं व्यापलेला आहे. अशा ग्रंथप्रेमी व ज्ञानमहर्षि साहित्यिकाशिवाय ग्रंथालय परिषदेला अन्य कोणता अध्यक्ष अधिक पात्र ठरूं शकेल ? सहनशीलता, सोशिकपणा, निस्पृहता व स्वाभिमान हे गुण अंगी बाणवण्याचा उपदेश प्रा. फाटकांनीं प्रस्तुत सत्कारसमारंभाच्या वेळीं पत्रकारांना केला तो 'आधीं केलें व मग सांगितलें' ह्या त्यांच्या स्वभाववैशिष्टयाला अनुसरूनच होता. आज सत्तरीनंतरहि त्यांनी ज्ञानोपासना व ज्ञानदान उत्साहानें व निष्ठेनें चालविलें आहे हे अभिनंदनीय आहे. प्रा. फाटक ह्यांच्या चतुरस्त्र कर्तृत्वाचा पत्रकारांना जसा अभिमान वाटला तसा इतर क्षेत्रांतल्या त्यांच्या शिष्यांना व त्यांच्या व्यासंगी वक्तृत्वाने भारावून गेलेल्या सामान्य श्रोत्यांना ही वाटेल. प्रा. फाटक ह्यांना दीर्घायुरारोग्य प्राप्त होवो असे चिंतून त्यांच्या ह्या सत्कारांत आम्हीहि सहभागी आहोत असें प्रगट करतों.

●●●

### प्रकट आभार

दीपावली मासिकाचा हा प्रजासत्ताकदिन विशेषांक व सोबतची क्रिकेट पुरवणी काढण्यासाठीं प्रामुख्याने श्री मं. वि. राजाध्यक्ष, बाळ ज. पंडित यांनी जे आपुलकीने साहाय्य केले त्याबद्दल आभार न मानणें कृतघ्नपणाचेच ठरेल. तसें त्यांचे साहाय्य आम्हाला नेहमीच होत असते हे निर्विवाद. इतरांनीहि आपुलकीने जे सहकार्य केले त्यांचेहि मनःपूर्वक आभार !

—संपादक



### दीपावली बुद्धिबळ क्र. ३ चे विजेते

१ **सौ. मालती मधुकर पाटील,** गावंडचाळ, स्टेशन रोड, ठाणें.

२ **श्री. मोहन दत्तात्रय कुळकर्णी,** यादव पहिलवान चाळ, मनमाळ, ( जि. नाशिक )

३ **सौ. प्रेमल देव,** C/o के. एन. सावजी, संपादक, 'पंचायत-राज', मलकापूर ( जि. बुलढाणा )

४ **कु. वासंती रामराव इंगळे,** ४२ नवी पेठ, जळगांव ( पू. खा. )

५ **श्री. हिरालाल काळु साळी,** वी. ए. डी. टी. सी. अध्यापक, म्यु. न्यू. इं. स्कूल, मु. पो. ता.–शहादें ( जि. धुळे. )

विजय प्राप्त करणाऱ्या वरील पांच भाग्यवान विजेत्यांना एक वर्षासाठीं दीपावली मासिक भेट पाठविण्यांत येईल.










## दीपावली बुद्धिवळ क्र. ४:

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | | २ | | ३ | ■ | ४ | | |
| ■ | ■ | | ■ | | ■ | | ■ | ■ |
| ५ | | | ६ | ■ | ■ | ७ | | |
| | ■ | ■ | ८ | | | | ■ | ■ |
| ९ | | १० | ■ | ■ | ■ | ११ | | १२ |
| ■ | ■ | १३ | | | १४ | ■ | ■ | |
| १५ | | | ■ | ■ | १६ | १७ | | |
| ■ | ■ | | ■ | १८ | ■ | | ■ | ■ |
| १९ | | | ■ | २० | | | | |

**"दीपावली बुद्धिवळाचे" नियम व अटी मला मान्य आहेत.**

स्पर्धकाचें नांव ____________________

____________________

पूर्ण पत्ता : ____________________

____________________

येथें कापा.    येथें कापा    येथें कापा

### आडवे शब्द—

१ साधा, गरीब, निरुपद्रवी माणूस
४ "खोटी" दंतपंक्ति
५ देवांचा पृथ्वीवरील जन्म
७ उपटणें–वळकावणें.
८ चपराक
९ कणखर
११ गर्विष्ठ–ताठलेला
१३ रामाच्या नशिबी आलेली एक गोष्ट
१५ गरीबांचे घर
१६ खजिनदार
१९ प्रारब्धासंबंधीचें प्राक्कथन
२० "संन्यस्त खड्ग" नाटकाचे लेखक

### उभे शब्द—

२ कबुली
३ अतीव उत्साहाचा दिवस
४ कमळांचे तळें
५ स्वर्गलोकची नर्तकी
६ जुन्या जमान्यांतील एक वाहन
१० प्रफुल्लित
१२ सैन्य
१४ वाईट कृत्यांबद्दल मिळणारें बक्षिस
१७ उंटाच्या पाटीवरचा उंचवटा
१८ व्रत

**उत्तरें पाठवावयाची शेवटची तारीख १५ फेब्रुवारी १९६४**
**अधिकृत उत्तर–पुढील अंकांत**

### स्पर्धकांकरितां नियम व अटी———

१. ही स्पर्धा निःशुल्क आहे.

२. ह्या स्पर्धेत कोणालाहि भाग घेता येईल.

३. स्पर्धेकरितां पाठविण्यांत येणारीं उत्तरें ह्याच पानावर छापलेल्या **चौकोनी कुपनांत** भरलेलीं असावीत. कूपनावर नांव व पत्ता लिहिणें आवश्यक आहे. **अन्यथा तीं विचारांत घेतलीं जाणार नाहींत.**

४. उत्तरें **'दीपावली बुद्धिवळ,'** संपादक, **'दीपावली,'** दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई–४ या पत्त्यावर पाठवावीत.

५. ह्या स्पर्धेकरितां आलेल्या अचूक उत्तरांतून ती **लॉट पद्धतीनें काढून** ज्यांचें उत्तर आमच्या उत्तराशीं बिनचूक असेल, अशा **पहिल्या पांच भाग्यवान विजेत्यांना** दीपावलीचे **वार्षिक वर्गणीदार** करण्यांत येईल व त्यांना वर्षभर दीपावली भेट म्हणून पाठविण्यांत येईल.

६. एकावेळीं एकाच स्पर्धकास फक्त एकच चौकोन पाठविता येईल.

७. स्पर्धेबाबत संपादकांचा निर्णय अखेरचा मानला जाईल. त्याबाबत कसलाहि **पत्रव्यवहार केला जाणार नाहीं.**

८. उत्तरें पाठवावयाची अंतिम तारीख १५ फेब्रुवारी १९६४ ही आहे. नंतर येणाऱ्या उत्तरांचा विचार होणार नाहीं. उत्तर पुढील अंकांत प्रसिद्ध केलें जाईल.

### बुद्धिवळ क्र. ३ चें उत्तर

**आडवे शब्द**

**१ अक्कलदाढ, ६ बढाईखोर, ७ रगड, ९ आरसा, ११ नार, १२ कन्हैया, १३ कारक १४ वारी, १५ समर, १८ नरम, २० रमानायक २१ रजनीकर**

**उभे शब्द**

**१ अत्तर, २ लगड, ३ ढबदार, ४ बाईल, ५ बारगीर, ८ गडकरी, ९ आयास, १० साकार, ११ नाकसूर, १४ बागुरडा, १६ मधुकर, १७ इनाम, १८ नलिनी, १९ मकर**

**विजेत्यांची नांवे**
**पान ६७ वर पहा**

अनुक्रमणिका






अनुक्रमणिका








